


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

भारत सरकारचें १९६५ चें श्रेष्ठता प्रमाणपत्र मिळविणारे एकमेव मराठी मासिक

एव्हरेस्टवर घडलेल्या तेजस्वी
क्रांतीचा गौरव--विशेषांक

# दीपावली

साहित्य * कला * संस्कृति



ऑगस्ट १९६५ • वर्ष २१ वें • मूल्य १। रु.

## श्रेयनामावली—

- **ही हिमालयाची हांक** : **डॉ. दत्तात्रय वामन** तथा **लाला तेलंग** यांची एव्हरेस्ट मोहिमेचे रंग–रूप वर्णन करणारी ('दीपावली'साठींच) खास मुलाखत—**प्रभाकर अत्रे** • **डॉ. लाला तेलंग** (व्यक्तिरेखा) **गोपाळकृष्ण भोबे** • **कांहीं क्षण...** **मनोहर वागळे** • **दुरून डोंगर साजरे**— **डॉ. (सौ.) मंजु घोष.** (याशिवाय नव्या आशा, एव्हरेस्टचे पंचांग, विक्रमांचाही एव्हरेस्ट वगैरे)
- **स्मृति तयांची...** **डॉ. सरोजिनी बाबर** • **जगन्नाथ शंकरशेट**—**सदानंद चेंदवणकर.**
- **शिबा राणीच्या शोधांत** (प्रवास वर्णन)—**दिलीप पु. चित्रे** • **देवाला डोळे असतात** (चालू कादंबरी)—**प्रभाकर श्री. नेरूरकर.**
- **चार फक्कड कथा** : शरीर कळलें, मिळाले, तरीही... **(शारीर–भास्कर उत्तरवार)** दुकानांत भागीदार हवा म्हणून लग्न केलें. पण **(भागीदार—गो. गो. दाते)** तिनें त्या घराला सोन्याची कळा आणली. म्हणून 'हें' भाग्य **(बोहोणी–वि. अ. तेंबे)** **(अपुरा ताज-लीला श्रीवास्तव)** याशिवाय सन्मानपुष्पें, अंदमानच्या अंधेरींतून वगैरे वाचनीय मजकूर, भरपूर छायाचित्रे व व्यंगचित्रें.

टे. नं. ७७७६५
Gram : Dalalart

दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

● संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचीहि अविकृत मतें असतातच असें नाहीं.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4.




**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४,
टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** : दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक **वर्गणी** रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# आज गात ही जयगाथा

**जिथें** प्रतिभा पांगळी होते. कल्पकता थिटी पडते. शब्द आपली शक्ति गमावतात. भावना मुकी होते. हृदयाचीं स्पंदनें मंद गतीनें होतात. आणि मनांत एक प्रकारचा कल्लोळ सुरूं होतो अशा असामान्य स्वरूपाच्या घटना कधीं कधीं ह्या बहुरंगी, बहुढंगी दुनियेंत घडतात. त्या घटनांनीं मति कुंठित होत असली तरी जगाची प्रगति निश्चित होत असते. शब्द मूक होत असले तरी सृष्टी त्यांचा जयजयकार कंठरवानें करीत असते. प्रतिभा पांगळी होत असली तरी पराक्रमाचे हिमालय मात्र जिंकले जाऊं शकतात. ह्या सामान्य मानल्या जाणाऱ्या घटनांनीं मानवी कर्तृत्वाचा असामान्य असा इतिहास लिहिला जात असतो. त्या इतिहासाच्या पानोपानीं सुवर्णाक्षरांनीं लिहिली जाते मानवाच्या बुद्धीची, प्रयत्नांची, परिश्रमांची, साहसाची, संकटाशीं झुंज देत देत जीवन जगण्याच्या जिद्दीची, त्याच्या कल्पकतेची, त्याच्या महत्वाकांक्षेची जयगाथा ! त्या जयगाथेचा शब्द न् शब्द ग्वाही देतो नव्या आशांची, नव्या उमेदींची ! खात्री पटते, विश्वास मिळतो माणसाच्या महत्तमतेचा ! ह्या असल्या विश्वासावरच अनेक पंगु माणसें पराक्रमाचे पर्वत पार करतांना दिसतात. अशांच्या कर्तृत्वानेंच क्रांति नवें नवें रूप घेत असते.

अशीच क्रांति यंदा हिमालयाच्या अत्युच्च शिखरावर घडली. शैल राधानाथ वा एव्हरेस्ट त्यानें पावन झाला. पुनीत झाला. युगामागुनी युगें गेलीं. मानवी कर्तृत्वाला तो आव्हान देत होता. 'या पराक्रमी पुत्रांनो, माझ्या कुशींत या' आणि अनेक पुत्र धांवून गेले. कांहीं विसावले त्याच्याच मंदिराच्या पायऱ्यांवर. कांहींनी फुलें म्हणून जीवनच वाहून टाकलें त्याच्या चरणावर ! एक तपापूर्वी मात्र तेन्सिंग–हिलरी नामक पुत्रांनीं राधानाथाची भेट घेतली. साऱ्या जगाला एक नवें धैर्य दिलें. मानवी साहसाचें एक सुवर्णयुग सुरूं केलें. त्यानंतर पुन्हां पुन्हां पूजेची प्रेरणा घेत अनेक माणसें गेली. कांहीं पराजित झाली तर कांहीं विजय मिळवून परत आली. यंदा राधानाथाचे आव्हान स्वीकारून भारताचे एकोणीस सुपुत्र मोर्चें बांधून निघाले. उरांत विजयाची कांक्षा होती. कारण मागील दोन पराभवांचे शल्य बोंचत होते. उणीवा समजल्या होत्या. त्यामुळें कुशल कमांडर कोहली व धाडसी नरेन्द्र कुमार ह्यांनीं योजना चांगली आंखली. त्या योजनेला साऱ्या साथीदारांनीं सुयोग्य साथ दिली. आणि God helps those, who help themselves या न्यायानें निसर्गानेंही रुसवा टाकून (१५ दिवस फार रुसवा धरला होता त्यानें) साथ दिली. संघ यशस्वी झाला. संघवृत्ति फलदायी ठरली. साहस मोठें ठरलें. अनेक नवे विक्रम (रेकॉर्डस्) सिद्ध झाले. नवांग गोंबू हा ३३ वर्षांचा तरुण यंदा दुसऱ्यांदा हिमालयाच्या उत्तुंग शिखरावर जाऊन आला. नऊ माणसें भारताचा विजयध्वज घेऊन गेली. रोंवून आली. आज मानवी साहसाची जयगाथा गात ते नऊ ध्वज तेथें खडे आहेत. आतां राधानाथ एकटा नाहीं. मानवी साहसाची त्याला सोबत आहे.

क्रांतीचें स्वरूप एकांगी असत नाहीं. ती फक्त पिस्तुलें घेऊन 'काली'चे रुद्र रूपच घेऊन येते असं नाहीं. कधीं त्या क्रांतीच्या हातीं असते गीता, तर कधीं असतो नांगर ! कधीं तिच्या मुखांतून स्रवतो समतेचा संदेश तर कधीं तिच्या हातीं असतात संशोधकाची उपकरणें ! यंदाची क्रांति हिमखंडावर घडली. तिची आयुधें होतीं बर्फाच्या कुऱ्हाडी (Ice Axes) आणि ऑक्सीजनचे मुखवटे ! क्रांतीचे सेनापति होते कमांडर कोहली व नरेंद्र कुमार ! त्या सेनापतींचे, सैनिकांचे, साथीदारांच्या जयगाथेची कांहीं पानें देऊन त्या क्रांतीचा जयजयकार व तिचें स्मरण करण्याचा प्रयत्न या अंकीं 'दीपावली'नें केला आहे. ह्या क्रांति सेनेतले एकमेव महाराष्ट्रीय सैनिक डॉ. दत्तात्रय वामन तेलंग (लाला तेलंग) यांची विस्तृत खास मुलाखत, एव्हरेस्टचे पंचांग, दुरून डोंगर साजरे, नव्या आशा वगैरे मजकूरांतून ह्या 'क्रांती'चें मोठेपण आपल्या ध्यानीं येईल. भारतीय कर्तृत्वावरचा, मानवी साहसावरचा आपला विश्वास वाढवेल. जें स्वप्नांनाही पेलणें कठिण असें अचाट साहस करणाऱ्या ह्या कृतिवीरांना–क्रांतिवीरांना 'दीपावली' साभिमान वंदन करीत आहे.

एव्हरेस्ट विजयाची गाथा सजविण्याचे कामीं आमचे एक मित्र-सुहृद् श्री. मनोहर वागळे यांनीं प्रथमपासूनच जें अमोल साह्य दिले, त्याबद्दल त्यांचे आभार मानणें 'नात्यां'त बसत नसल्यानें कृतज्ञता व्यक्त करतो.

— संपादक

## प्रवासवर्णन अप्रतिम !

स. न. वि. वि.

आपल्या मासिकाचे गेल्या तीन चार महिन्यांचे अंक विशेष 'खुलले' आहेत. तसा प्रत्येक अंक 'रंगलेला' असतोच.

आपल्या अंकात श्री. चित्रे यांचे इथिओपियाचे जें प्रवासवर्णन झळकत आहे तें अनेक दृष्टीनें 'लक्षणीय' आहे. मराठींत प्रवास वर्णनें हा प्रकार बऱ्याच मान्यवरांनीं हाताळला आहे. परंतु प्रवास फार थोडे कलावंत 'जगले' आहेत. बहुतेक असें आढळून येते कीं, कांहीं लेखकांच्या बाबतींत घडलेला प्रवास हे लेखनाच्या बाबतींतलें केवळ एक निमित्त झालेले असतें. संवेदनाक्षम व्यक्तिमत्वाच्या नव्या ठिकाणाच्या भेटी आणि वास्तव्यांतून उद्भवलेल्या प्रतिक्रिया या जेव्हां सर्जक प्रतिभेच्या अस्मितेंत डुंबून निघतात तेव्हां आविष्कार कसा चित्ताला जाऊन भिडतो याचे श्री. चित्रे यांचे प्रवासवर्णन अद्वितीय आणि अप्रतिम उदाहरण होय. त्यांच्या शैलीचा एक प्रकर कांहींसा खटकतो तो असा कीं, नुसते तुटक शब्द सर्वच ठिकाणीं अर्थघन ठरत नाहींत सूचकता उलट खंडित होते.

प्रवासवर्णनाच्या संबंधांत आणखीन् एका विचाराचा येथें निर्देश केल्यास अनाठायीं किंवा अप्रस्तुत होणार नाहीं. प्रवास करणारी व्यक्ति अनुभव टिपून घेताना स्वतः पण कांहीं अंशीं बदलण्याची, सुधारण्याची, (क्वचित बिघडण्याचीहि) शक्यता नसते काय ? आपल्या पाहण्यांत बऱ्याच वेळां असे येते कीं, परदेशागमन झाल्यावर माणूस साफ किंवा थोडा बदललेला 'असतो' किंवा निदान 'दिसतो' ! या अनुषंगानें प्रवासवर्णनांत 'स्पर्श' (Touch) आल्यास ते अधिक रम्य ठरेल.

आपला,

**मुंबई–५१** **दा. गो. देशपांडे**

## रंगदार व आगळें प्रवासवर्णन

स. न. वि. वि.

'दीपावली' चा 'जुलै' अंक पाहिला. दर्जेदार निघाला आहे. संपादकीय औचित्यपूर्ण व वजनदार वाटलं. दिलीप चित्रे यांनीं आपल्या प्रवास वर्णनांत दमदार रंग भरला आहे व पुढील वाढत्या रंगदारपणाची व आपल्या आगळेपणाची चुणुक प्रकट केली आहे. परवांच मला 'पेलिकन'चे सुरेश राऊत म्हणाले कीं आपण 'दीपावली'चे अंक नियमित वाचतो व प्रत्येक अंक दर्जेदार असतो. माझ्या शेजाऱ्यांची पण तशीच प्रतिक्रिया त्यांनी माझ्याजवळ व्यक्त केली आहे. पुढील अंक क्रांति-संस्मरण अंक आहे व तो अधिकच सुंदर निघेल यांत शंका नाही.

आपला

**विलेपार्ले** **प्रभाकर नेरुरकर**

स.न.वि.वि.

## अंतर्बाह्य सुरेख अंक

स. न. वि. वि.

आपला जूनचा 'विशेष कथा' अंक वाचला. अंक अंतर्बाह्य सुरेख आहे. विशेषतः 'मैत्रीण', 'लव्हाळी वांचती' आणि विभावरी शिरुरकरांची मुलाखत.

'मैत्रीण' वाचून मनात काही काहूर उठले. जीव बेचैन झाला. म्हणून थोडंसं लिहिलं तर चालेल ना ?

गंगाधराच्या मैत्रिणीचं दुःख केवळ हवं तेवढं शरीरसुख मिळत नाही यात आहे का ? तिच्या मनाच्या उभारीला उभं राहायला केवळ त्याचं शारीरिक सान्निध्य आवश्यक आहे का ? शेवटी तीहि माणूसच! पण गंगाधरासाठीं साऱ्या जीवनाचा होम करणारी सुचेता केवळ शरीर सुखाच्या कल्पनेच्या एवढी आधीन होईल असं वाटत नाही. मला वाटतं मानसिक प्रेम ही कल्पना नाही. किंबहुना एखादं रसिक, शिक्षित मन मानसिक प्रेमाच्या केवळ आधाराने तरुन जाऊ शकेल. अर्थात् हा प्रत्येकाच्या कुवतीचा प्रश्न आहे. प्रेमातला शारीर भाग टाकाऊ आहे असं नाही. पण केवळ तेवढाच आहे असंहि नाहीं. प्रेमाला– मानवी प्रेमाला कसलीच अपेक्षा नाही हे खोटं आहे. कसलीहि नसली तरी प्रेमाला प्रेमाची अभिलाषा जरुर आहे. असावी या जगात सर्व काही reciprocal आहे. अगदी 'Give & Take' तरीहि–

गंगाधर आपल्या प्रेयसीला taken for granted मानतो हेच तिचं दुःख आहे असं मला वाटतं. जणु प्रीतीची स्वप्नं सरली आणि उरला फक्त व्यवहार, देवाण घेवाण.

सुचेताला थोडी सहानुभूति दाखवायला हवी होती लेखकानीं असं मला वाटतं. या धारिष्टयाबद्दल श्री. गोखले मला क्षमा करतील.

**मुंबई** **आर.**

## सुरेख भावकविता

स. न. वि. वि.

१९६५ चे श्रेष्ठता प्रमाणपत्र मिळाल्याबद्दल मनःपूर्वक अभिनंदन.

'जुलै'चा अंक आजच वाचला. दिलीप चित्रे यांचे प्रवास (?) वर्णन कांहीं तरी नवीन देऊन जाते खास ! प्रवास वर्णन आणि भाषांतरित कादंबरी उत्कंठा निर्माण करतात.

कथांमध्यें देशपांडे यांची 'फॅक्ट' फक्त मनाची पकड घेऊं शकली.

या अंकाचे संपादकीय वाचतांना एखादी सुरेख भावकविता वाचल्याचा आनंद मिळाला.

'दीपावली'ची सन्मानपुष्पें हे एक अत्यंत हृद्य वैशिष्टच होय. सौ. हिराबाई, कुमारगंधर्व यांच्यावर स्तुतिसुमनें उधळून 'दीपावली'नें रसिकता प्रकट केली आहे.

या रसिक प्रवृत्तीच्या मासिकाला रसिकांकडून अधिकाधिक लोकप्रियता लाभल्यास नवल ते काय ?

आपला,

**अहमदनगर** **उत्तम शिरवळकर**

**आम्ही असें लिहितो !**

*या लेखमालेंतील नाटककार*

श्री. वसंतराव कानेटकर

यांची मुलाखत पुढील

अंकांत प्रसिद्ध होईल.





अनुक्रमणिका

# पंगूम् लंघयते गिरीम्

## डॉ. दत्तात्रय वामन ऊर्फ लाला तेलंग ह्यांची साहस कथा



डॉ. लाला व सौ. डॉ. सुलू तेलंग खाटमांडू येथें

डॉ. दत्तात्रय वामन तेलंग एम्. डी. उर्फ लाला–मुलगा म्हणून त्यांच्या आईबापांना एकुलता एक. अर्थातच आप्तेष्टांकडून झालेल्या कौतुकाच्या कोंदणांत बाळपणापासून वाढलेला. त्यांचे वडील वामनराव तेलंग हेहि एक डॉक्टरच. आपल्या पेशांत त्यांनी उत्तम यश व प्रतिष्ठा मिळविलेली.

तीन वर्षांपूर्वी लाला एम. डी. ची परीक्षा उत्तीर्ण झाले. तेव्हांच वामनरावांना वाटले असेल कीं, 'चला सुटलों. डोक्यावरचें ओझें, हलकें झालें. एका मोठ्या जबाबदारीतून मोकळा झालों !

तसें वाटणें स्वाभाविक होतें. कारण एस. एस. सी.च्या वर्गांत असतांनाच लाला पॉलीन्युरायटीसनें–एका दुर्धर रोगानें आजारी झाला. आणि त्याचा परिणाम पायांवर होऊन त्याला पंगुत्व आलें. चार महिने अंथरुणाला खिळून असलेल्या या मुलानें त्या वर्षीची एस. एस. सी. ची परीक्षा मात्र बुडविली नाहीं. त्यानें पडल्या पडल्या अभ्यास करून परीक्षेंत उत्तम यश तर मिळविलेंच आणि पुढें आपल्या पंगुत्वावरहि मात केली. त्याची इच्छाशक्ति इतकी जाज्वल्य कीं गिर्यारोहणासारखा छंद त्याला लावण्याइतपत ती पराकोटीला गेली.

हा छंद होता इथपर्यंतच ठीक होतें. मुंबईच्या गिर्यारोहण संस्थेंत पहिले धडे गिरवितांना या छंदानें शैक्षणिक प्रगतीला बाधा आणली नाहीं. एम. डी.च्या परीक्षेंत लाला यशस्वी झाले. आणि याचवेळीं भाग्यवश एका एम. डी. झालेल्या मुलीशींच (सौ. सुलोचना) त्यांचा विवाहहि झाला. गिर्यारोहणाऐवजीं संसार रथावर आरोहण झाल्यानंतर वरिष्ठांना काळजीचें कोणतेंच कारण उरलें नाहीं. पुढील शिक्षणासाठीं दोघेंहि पतिपत्नी अमेरिकेलाहि निघून गेलीं.

अमेरिकेंतून वडिलांना पत्रें येत होती. कुशल कळविणारीं. प्रगतीचीं; परंतु त्यांतच एक अनपेक्षित पत्र आलें. सगळयानाच अस्वस्थ करणारें. पत्राचा मसुदा वरवर दिसायला साधा होता; पण मायेच्या आंतड्याला कळ आणणारा होता. वडील बेचैन झाले.' हौस म्हणून मुलगा पर्वतारोहण करतो, कांहीं पर्वतरोहण शिकविणाऱ्या संस्थांचा तो सदस्यहि आहे हें ठीक होतें; पण पत्रांत मुलाने कळविले होतें कीं आपण एव्हरेस्ट चांचणीसाठीं आपण हिंदुस्थानांत येत आहोंत.

'मन चिंती तें वैरी न चिंती' म्हणतात. आपलें मूल साधारण उंचीवर चढलें तरी आपलें मन घाबरतें. मुंबईत तिसऱ्या किंवा चौथ्या मजल्यावर राहणाऱ्या माणसाला आपल्या परिवाराच्या बाबतींत कोण काळजी असतें हें, आपण पाहतोंच आणि एव्हरेस्ट सारख्या जगांतील अत्युच्च शिखरावर आरोहण करायला जाणाऱ्या पथकाबरोबर जायचा आपल्या एकुलत्या एक मुलानें निर्णय घेतलेला आहे असें कळल्यानंतर या मुलाच्या वडिलांची काय स्थिति झाली असेल हें 'जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे'.

वामनराव अस्वस्थ झाले; पण त्यांनी स्वतःला सांवरलें. कारण पहिल्या महायुद्धांत भारतीय सैनिकांच्या शुश्रुषेसाठीं ते देखील इजिप्त आदि देशांतील युद्ध आघाडीवर गेले होते. त्याकाळीं कॅप्टनचा हुद्दा मिळवून ते परत आले. पण त्या घटनेंत व या घटनेंत बराच फरक होता. तिथें राज्यकर्त्यांवर जबाबदारी होती; संरक्षणाची हमी होती. इथें तसें काय होतें? मुलगा





अनुक्रमणिका

महापर्वत चढायला उमेदीन गेला, पण घरीं मात्र त्यानें काळ-जीचा पर्वत ठेवला. थोडेथोडके नव्हे चार महिने. हा चार महि-न्यांचा काळ त्याच्या आईवडिलांनीं कोणत्या मनःस्थितींत कंठिला असेल तींच जाणें.

अखेरीस लाला ज्या भारतीय गिर्यारोहक पथकाबरोबर एव्हरेस्ट जिंकण्यासाठीं गेला तें पथक यशस्वी झालें; नुसतें यशस्वी नव्हे तर अत्यंत यशस्वी, जगांतील गिर्यारोहकांचा उच्चांक मोडणारें आणि चार वेळां शिखरावर स्वारी करून भारताची कीर्तिध्वजा उंच रोवणारें. सर्वांना आनंद झाला.

तेलंग हे गोव्याचे आहेत. लाला यांचे आजोबा गोव्यांत रेव्हेन्यू खात्यांत नोकरी करीत होते. वडील आणि चुलते यांनी मुंबईची ही आपली कर्मभूमि ठरविली. लालांचा जन्म इथें महाराष्ट्रांत झाला. म्हणजे जन्मभूमि आणि पितृभूमि यांचें नांव त्यांनी आपल्या नांवाबरोबर उज्ज्वल केलेलें आहे. तिशींतला हा तरुण मध्यम बांध्याचा, मध्यम उंचीचा, ओठावर मिशी आहे म्हणून थोडासा वडीलपणा दिसावा.

प्रसूतिशास्त्रांत प्राविण्य मिळविण्यासाठीं पुढील अभ्यासासाठीं लाला आतां इंग्लंडमध्यें जाणार आहेत. त्यांत ते हमखास यश मिळवितील आणि आपली वडिलार्जित व्यवसायांतहि पूर्ण यशस्वी होतील यांत शंका नाहीं; परंतु आजचें त्यांचें यश हा जीवनांतील सर्व यशांचा कळस आहे. एव्हरेस्टइतकाच उंच !

**— गोपालकृष्ण भोबे**

## डॉ. लाला तेलंग व गिर्यारोहण

**विद्यार्थीदशेपासून साहस व गिर्यारोहणाचीं पुस्तकें वाचण्याचा विलक्षण छंद. परन्तु गिर्यारोहणाविषयीं प्रत्यक्ष कांहींतरी करावं ही जाणीव प्रथमतः १९५३ जाली तेनसिंगनें एव्हरेस्टवर यशस्वी चढाई केली तेव्हां झाली. १९५४ सालीं हिमालयन माऊन्टनियरींग इन्स्टिटयूट सुरू झाले. व त्याचवेळीं ह्या शाळेचा आपल्या छंदा-साठीं कांहीं विधायक उपयोग करून घेतां येण्यासारखा आहे हे लक्षांत आले. परन्तु १९५३ ते १९५९ पर्यंत मेडिकल कोर्समुळें कांहींही हालचाल करतां आली नाही. १९५९ साली क्लायम्बर्स क्लब, मुंबई ह्यांनीं गिर्यारोहणाचा कोर्स सुरू केला. पहिला बेसिक कोर्स सह्याद्रीच्या पायथ्याशीं पारसिक येथें आयोजित करण्यांत आला होता, तो पुरा केला. १९६० साली दार्जिलिंग येथें हिमालयन माऊन्टनियरींग इन्स्टिटयूटचा बेसिक कोर्स पुरा केला. हा कोर्स खुद्द तेनसिंगच्या मार्गदर्शनाखालीं आयोजित करण्यांत आला होता. १९६० सालीं क्लायम्बर्स मुंबई ह्यांचा पारसिक येथील एडव्हान्स कोर्स पुरा केला. १९६२ सालीं हिमालयन माऊन्ट-नियरींग इन्स्टिटयूटचा दार्जिलिंग येथें एडव्हान्स कोर्स. हा कोर्स पश्चिम सिक्कीम मधील रोयांग शिखर (२२,००० फूट) च्या मोहिमेच्या स्वरूपांत होता. त्याचें नेतृत्व कर्नल जसवाल व मार्ग-दर्शन नवांग गोम्बु ह्यांनीं केले होते. १९६१ पासुन क्लायम्बर्स क्लब, मुंबई ह्यांच्या विद्यमाने होणाऱ्या कोर्समध्यें सुपरवायझर म्हणून काम केले. अन्नपूर्णा ३ (१९६१), थरकोट (१९६३) श्री कैलास (१९६३) ह्या मोहिमेसाठीं निमंत्रणें आलीं होतीं. परन्तु मेडिकल कोर्समुळें व अमेरिकेला जायच्या बेतामुळें ही निमंत्रणे साभार नाकारण्यांत आली. १९६२ च्या एव्हरेस्ट मोहिमेसाठींही येण्याची तयारी आहे कां असें विचारण्यांत आले होते, परन्तु त्यांत निवड झाली नाही.**

**अमेरिकेतील वास्तव्यांतही गिर्यारोहणाचाही छंद चालूच होता. क्लीव्हलंड माऊन्टनियर्स ह्यांच्यासह सेनेका रॉक (वेस्ट व्हर्जिनीया) येथें आरोहण केले.**













**धोक्यांच्या छायेंत वावरल्याशिवाय आणि धोक्यांशीं झुंज दिल्याशिवाय आजच्या जगांत कांहींही 'मोठे असामान्य' करून दाखवितां येणार नाहीं. पंडितजींचा तरुणांना एक मौलिक संदेश असे** "Live Dangerously". **संदेश दिले जातात. लाखांत एखाद्याच्या मनांतून हुंकार येतो "मी तयार आहे." तो मनांतला हुंकार जेव्हां कृतीचें रूप घेतो आणि कृति जेव्हां यशाचे 'एव्हरेस्ट' गांठते तेव्हां जगांत कांहीं असामान्य विक्रम सिद्ध होतात. संकटाच्या भट्टींत पराक्रमाचे, पौरुषाचें सोने उजळून निघते. एव्हरेस्ट विजयही त्यांतलाच ! त्या मोहिमेचे डॉक्टर म्हणून मुंबईचे विख्यात प्रसूतिशास्त्रज्ञ (व गिर्यारोहक) डॉ. दत्तात्रय वामन तेलंग एम्. डी. हे गेले होते. पथकांतील ते एकमेव महाराष्ट्रीय ! त्यांच्या अनुभवांची ही "सत्यकथा"....**

**प्रश्न**:—ह्या वर्षींच्या एव्हरेस्ट मोहिमेंतील सदस्यांची निवड कशी झाली ? आपण प्रसूतिशास्त्रज्ञ आहांत. प्रसूतिशास्त्रज्ञ व गिर्यारोहण ह्यांचा तसा संबंध नाहीं. असें असूनही आपली निवड करण्यांत आली. त्यामागें कांहीं कारणें असलींच पाहिजेत. ती निवडीची कारणें व एकंदर पार्श्वभूमी सांगाल काय ?

**डॉ. लाला**:—गेल्या वर्षींच्या ऑगस्ट (१९६४) मध्यें एव्हरेस्ट मोहिमेसंबंधीची आंखणी करण्यांत आली. सर्वप्रथम नेते म्हणून कमांडर एम्. एस. कोहली व उपनेते म्हणून मेजर नरेंद्रकुमार ह्यांची निवड करण्यांत आली. त्यानंतर गिर्यारोहणाची मागील कारकीर्द व अनुभव वगैरे ध्यानीं घेऊन २८ सदस्यांच्या एका तुकडीचा एव्हरेस्टवर पूर्व (Pre Everest) मोहिमेवर म्हणून पाठविण्यांत आलें. ती मोहीम हिमालयाच्या सिक्कीम भागांतल्या रोथांग (Rathong) ह्या २१,९११ फूट उंचीच्या शिखरावर गेली. त्या मोहिमेवर जी मंडळी गेली त्यांत मी होतो. त्या २८ सदस्यांतून योग्य ती चांचणी घेऊन दि. १४ नोव्हेंबर १९६४ ला १५ सदस्यांची निवड करण्यांत आली. ती निवड इंडियन माऊंटनियरिंग फाऊंडेशनच्या खास समितीच्या सदस्यांनीं केली. त्यांत गिर्यारोहणाची तांत्रिक माहिती व एकंदर उंचीवरच्या वायुमानाला तोंड देण्याची माणसांची क्षमता ध्यानीं घेऊन निवड करण्यांत आली. डॉक्टर म्हणून एकूण दोघांची निवड झाली. मी, डॉ. सोरेस असें आम्हीं दोघे निवडले गेलो. त्यांतील डॉ. सोरेस ह्यांना जयनगरला पोहोंचल्यानंतर दोन दिवसांनीं हॉर्ट ॲटॅक आला व त्यांना परतावें लागले. व त्यांच्या जागीं डॉ. चक्रवर्ती ह्यांना पाचारण करण्यांत आले. ह्या निवडीमध्यें मला वाटते (how good a climber you are)

विरळ वातावरण, थंडी वारे ह्यांना तोंड देण्याची शक्ति, व एकमेकांत मिसळण्याची व परस्परांना सांभाळून घेण्याची वृत्ति ह्या गुणांचाच विचार झाला असला पाहिजे. ह्यांतील अखेरचा म्हणून सांगितलेला गुणच सर्वांत महत्त्वाचा !

प्रः—हिमालय मोहिमेंत आजवर गेलेल्या डॉक्टरांत आपण पहिलेच प्रसूतिशास्त्रज्ञ होता काय ?

डॉः—मीच पहिला प्रसूतिशास्त्रज्ञ होतो कीं, नाहीं मला निश्चित माहीत नाहीं. बहुधा डॉक्टर्स जातात ते मात्र regular डॉक्टर्स म्हणूनच जातात. गिर्यारोहक म्हणून जात नसत. अमेरिकन तुकडींतून एव्हरेस्ट शिखरावर डॉ. हॉर्न वाईन एम. डी. हा पोंहचला खरा पण तो पथकाचा डॉक्टर म्हणून गेला नव्हता. आम्ही दोघे मात्र डॉक्टर म्हणून जरी गेलो होतो तरी आमची भूमिका गिर्यारोहकाची (Climber) होती.

प्रः—मग डॉक्टर म्हणून आपल्याला शिखरावर जायची परवानगी दिली गेली नाहीं काय ?

डॉः—जवळजवळ तसंच ! पण ह्याला कारणं मात्र तीन. पहिलं—शिखरावरून ज्यावेळीं तुकडी परत येते त्यावेळीं त्यांना वैद्यकीय मदत देण्यासाठीं डॉक्टर हा खालीं असावाच लागतो. बहुधा त्यांना कांहींना कांहीं मदत लागतेच. दुसरं—ही मदत त्यांना जास्त परिणामकारतेनें देणाऱ्या सर्व सोयी व साधनें एव्हरेस्टवर तरी २१,३०० फूट किंवा त्याखालींच असतात. तिसरं—ऑक्सिजनचा उपयोग ह्या वेळेस "पॉलिसी" म्हणून २५,००० फूटांवरून करण्यांत आला व त्यानुसार आम्हांपैकीं कुणालाच २५,००० फूटांपर्यंत चढण्यास कमांडर कोहलीची बंदी नव्हती. डॉ. चक्रवर्ती हे तसे २५,००० फूटावर जाऊन आलेही. मी स्वतः २३,००० फूटांच्या थोडा वर जाऊन आलों. २५,००० फूटांवर जाण्यानें ऑक्सिजन वापरावा लागला असता व शिखर तुकडीस तेवढा ऑक्सिजन कमी झाला असता. ह्याच संदर्भांत गुरुदयाल सिंग, जोशी, मुल्कराज यांनीं स्वतः "फिट" असतांना सुद्धां शिखरावर जाण्यास स्वखुशीनें नकार दिला व शिखर तुकडीचा Support म्हणून २५,००० फूटावर राहाण्याचें कबूल केलें. हा खरा स्वार्थत्याग !

प्रः—हिमालयांतील हवामानांत प्रामुख्यानें कोणकोणते रोग उद्भवतात ?

डॉः—सर्वसाधारणपणें इकडे जे आजार होतात तेच तिकडेही होतात. विशेषतः सर्दी खोकला इत्यादि घशाचे विकार अधिक होतात. तसेंच "फ्रॉस बाइट"ही होण्याची शक्यता असते. विरळ हवेची शरीराला संवय होईपर्यंत (ह्यालाच 'अॅक्लमटायझेशन' म्हणतात) जे विकार सर्वसाधारण उद्भवतात त्यांत डोकेदुखी, निद्रानाश, भूक मंदावणें व उलटचा ह्यांचे प्रमाण जास्त आढळते.



**डॉ. लाला तेलंग**

प्रः—फ्रॉस बाइट म्हणजे नेमके काय? तो बरा करण्याचा उपाय काय ?

डॉः—'फ्रॉस बाइट'मध्यें हातापायांच्या बोटांना एक प्रकारची बधीरता येते. साऱ्या पेशी मरतात. तो होऊं नये म्हणून दक्षता घेणें सोपें आहे पण हा झाल्यावर मात्र फार कांहीं करतां येत नाहीं.

प्रः—हा रोग कांहीं विशिष्ट उंचीवर होतो काय ?

डॉः—नाहीं ! कुठल्याही उंचीवर होऊं शकतो. मुख्यतः निष्काळजीपणामुळें तो होण्याची शक्यता असते. निसर्गाचा कोप झाल्यानेंही फ्रॉस बाइट होतो. पायांना खूप घाम आला आणि ओले मोजे काढले नाहींत. घाम पुसला नाहीं तरीही तो होण्याची शक्यता असते म्हणून गिर्यारोहक आपल्याजवळ कोरडया मायमोजाची एक जोडी सदैव बाळगत असतो. Healthy body is best prevention हेंच खरें !

प्रः—तुमच्या ह्या मोहीमेच्या मार्गावरच्या खेडयापाडयांतल्या लोकांनाही मग तुमच्या औषधांचा उपयोग होत असेल ?

डॉः—होतो तर ! खूप माणसें येऊन औषधासाठीं रांगा लावत असत. दिवसाला साधारणपणें ५०–६० लोक येत असत.

**मुलाखत— प्रभाकर अत्रे**





अनुक्रमणिका

# नांवांत काय आहे ?

नांवाची महति सामान्यांना. असामान्य गोष्टींना तुम्ही कुठल्याही नांवाने संबोधा, तरी त्यांच्या अलौकिक स्वरूपाला त्यामुळे मुळींच बाध येत नाही. हेच सत्य सांगत आली आहे "एव्हरेस्ट"च्या नांवाची कुळकथा.

हिमालयाच्या कुशींतील शिखर नं. १५ ला "एव्हरेस्ट" हे नांव १८६५ साली देण्यांत आलं. तोंपर्यंत त्याला एखादे स्थानिक नांव देण्याचे सर्व प्रयत्न निष्फळ ठरले. १८५५ सालीं "देवधुंगा" हे नांव सुचविण्यांत आले. परन्तु नेपाळी लोकांना ते नकली व अनोळखी वाटूं लागले. त्याच वर्षी "गौरीशंकर" ह्याही नांवाची सूचना करण्यांत आली. नंतर आढळून आले कीं, गौरीशंकरची उंची फक्त २३४४० फूट असून ते एव्हरेस्ट पासून ३६ मैल दूर आहे !

नंतरच्या काळांत विचारांत घेण्यांत आलेली तिबेटी नांवें चोमो लुंग्मा, चोमो लुंग, आणि चामा लुंग किंवा नेपाळी नांव महालुंगर हिमल शिखरांपेक्षांही प्रदेशालाच अधिक अनुलक्षून होती. तिबेटच्या विद्वानांनी त्यांच्या पवित्र ग्रंथातून ह्या शिखराबद्दल असलेला काव्यात्मक उल्लेख शोधून काढला. "मिटी गुटी चापु लोंग ना" भावार्थ असा– कोणालाही शिखर जवळून पहातां येणार नाहीं. असं असलं तरी शिखर निरनिराळ्या नऊ दिशांनी पहातां येईल. जो पक्षी ह्या शिखराएवढ्या उंचीवर जाईल तो आंधळा होईल !– कुठल्याही तिबेटी माणसानें ह्या असल्या नांवांना मान्यता दिली नाही. म्हणूनच एका शतकानंतरही जगाला "एव्हरेस्ट" ह्या नांवावरच समाधान मानून घेणं भाग आहे.

ह्या शिखराची सध्यां रूढ असलेली नांवें:

इंग्रजी— एव्हरेस्ट.

मराठी— शैल राघानाथ.
गौरीशंकर (चुकीचं असलं तरी !)

तिबेटी — चोमु लुंग्मा (जगन्माता–Goddess Mother of the World)

नेपाळी— सगरमाथा. ह्याची व्युत्पत्ती दोन प्रकारें.
(१) नेपाळी लोकांच्या कल्पनेप्रमाणें हिमालय सागरांतून निर्माण झाला आहे. म्हणून त्याचा माथा हा सगर माथा !
(२) पाण्यांतून उत्पन्न होणारे हिम ज्यांच्या माथ्यावर सदैव असते तो सगरमाथा !

● ● ●

प्र:–तिकडच्या कॉमन रोगांची कांहीं कल्पना ?

डॉ:–मलेरिया, (दलदलीमुळें डांस फार) पोटांतले कृमि-जंतु, खोकला आणि टी. बी.ची लागण फार मोठी आढळून येते.

प्र:–जवळपासच्या लोकांना ही जी वैद्यकीय मदत तुम्हीं केली त्याचा कांहीं फायदा झाला काय ?– मोहीमेच्या दृष्टीने ?

डॉ:–फायदा होतो. त्याचें स्वरूप वेगळे असते इतकेंच ! आमच्या टीमचा Local Purchase Officer सोनम् ग्याट्सो होता. अंडीं, बकरी, कोंबड्या वा अन्य खरेदीसाठी ह्या लोकांत जावे लागे. त्याला एखादी गोष्ट लोक देईनासे झाले कीं, डॉक्टर गेला कीं, हटकून मिळे! असल्या पथकांतून येणारा आमच्यासारखा डॉक्टर म्हणजे तिकडील लोकांना पर्वणीच. Medical Parade संध्याकाळीं ४,४-३० ला सुरू व्हायची. त्यावेळीं बरीच गर्दी व्हायची. बरेचजण आपल्याला कांहींहीं झालेलें नसतांनाही "त्याला झालंय् तेंच मला झालंय्. त्याला दिल्या तसल्याच रंगाच्या गोळ्या मला द्या." असं सांगत. कांहीं जण एकदां रांगेंत येऊन गोळी घेऊन परत मागें जाऊन रांगेत रहात. एक अनुभव सांगतो. आमच्या कॅम्पवर सायंकाळीं ७ वाजतां एकजण आला व घरीं बोलावूं लागला. छावणींतच घेऊन ये म्हटल्यावर "आतां येतो– अगदीं जवळच तर रहातो आम्ही !" असं म्हणून गेला. रात्रीं १० वाजतां एका इसमाला डोलींत घालून आणले–चार मैलांवरून !

प्र:–तुम्हीं तिकडे नेलेली औषधें शेवटपर्यंत चांगली राहिली ? काय काय औषधें नेली होती ?

डॉ:–चांगली राहिली. कारण तीं आम्हीं कांहीं खास पद्धतीनें पॅक करून घेतली होतीं. प्लॅस्टिकच्या बाटल्यांत ती भरून नेलीं होतीं. सिलीकाजेलच्या छोट्या पिशव्या त्या बाटलींत ठेवल्या. बाह्य हवेचा ह्यामुळें परिणाम झाला नाहीं. अॅनासिनपासून टेरामायसिनपर्यंत सर्व "सिनस्" नेली होती !

प्र:–हिमालयावर मुख्यत: घशाचे रोग (Throat trouble) उत्पन्न होतात ते कां ?

डॉ:–विशिष्ट उंचीवर गेल्यावर ऑक्सीजनचें प्रमाण कमी होते आणि मग to breathe more air तोंडानें श्वासोच्छ्वास करण्याची प्रवृत्ती बळावते. त्यामुळे घशावर थंड हवेचा मारा होऊन घशाला सूज येते.

प्र:–आपल्या मोहिमेंतील कॅप्टन बहुगुणा हे फायनल कॅम्प (२७,९३० फूट) पर्यंत जाऊन पोटदुखीमुळें परत आले असें वाचले. ऐनवेळीं एकदम नेमकें काय झाले ?

डॉ:–Base Camp मध्यें असतांना एक विशिष्ट प्रकारची 'अॅलर्जी' त्याच्यात Develop झाली. विशिष्ट प्रकारचा Rash अंगावर यायचा. पित्तासारखी खाज सुटायची. तरीही ते चढून गेले. पण फायनल कॅम्पपर्यंत पोंहचल्यावर त्याला तेंच झाले. कपडे अंगात असायचे. ते सारे काढून मग अंग खाजवायचे, पुन्हां कपडे घालायचे व मग पुढें जायचे असें चालवायाचे. पुढें त्याला त्रास असह्य झाला व परत यावें लागलें.

अनुक्रमणिका

प्र.:–सर्व सदस्यांची प्रकृती ठीक रहावी म्हणून आपण सर्वसाधारणपणें काय केलें ? आणि आपल्या इतर कामाचें स्वरूप काय ?

डॉ.:–"To nip in the bud" हे आम्हां डॉक्टरांचं सूत्र होतं. त्यामुळें एखाद्या छोटया आजाराचे मोठ्या विकारांत रूपांतर होऊं नये हृणून आम्ही तांतडीचे उपचार करीत असूं. ह्याशिवाय Prevention is better than Cure ह्या तत्त्वाप्रमाणें आम्ही सदस्यांना रूटिन म्हणून कांहीं गोळ्या नियमितपणें देत असूं ! इतर कामें—महिनाभर ॲडव्हान्स बेस कॅम्पवर असतांना तेथील जेवणाखाण्याची व्यवस्था, येणाऱ्या जाणाऱ्या सदस्यांची सोय, शेर्पाच्या ज्या फेऱ्या होत त्यांच्या सामानांची नोंद, इत्यादि.

प्र.:–ह्या काळांत आपल्याला कधी एकटें राहू याचा प्रसंग आला होता काय ?

डॉ.:–२१३०० फुटावर मी जवळ जवळ तीन रात्री व चार दिवस अगदी एकटा होतो. एका तंबूंत मी व दुसऱ्या तंबूंत स्वयंपाकी असे होतो. माझा बॅटमन सुद्धां नव्हता !

प्र.:–त्या काळांत आपण वेळ कसा काय घालवला ?

डॉ.:–ट्रॅन्झिस्टर सारखा लावून ठेवीत असे–आवाजाचीच तेवढी सोबत ! बरचसं लेखन मी ह्या काळांत केलं–पत्रलेखन व मोहिमेसंबंधीचं ! Lala consumed more than half the stationery of the expedition इति कमांडरसाहेब !

प्र:–बॅटमन म्ह. नेमका कोण ? त्याचे काम काय असते ?

डॉ.:–वास्तविक बॅटमन् हा शब्द माझ्या दृष्टीनें चुकीचा आहे. प्रत्येक सदस्यास एक शेर्पा ऑर्डली म्हणून दिलेला असतो. छावणींतील सारी किरकोळ कामं, झोंपण्याच्या पिशवींत हवा भरणें, सामानसुमानाची जबाबदारी हे त्याचे कार्य. आम्ही बिछान्यांतून उठून प्रातर्विधी आटपून सरळ मोर्च्यावर चालूं लागायचे. ते आमची फार काळजी घेत. इतक्या दिवसाच्या सहवासामुळें आमच्यांत Companionship निर्माण झाली होती. एकदां मी खालच्या कॅम्पमध्यें व हा आर्डली–त्याचं नांव टिची–वरच्या कॅम्पमध्यें अशी तीन दिवस फारकत झाली होती. तेव्हां तो बेचैन झाला. वरतीं सारखीं आल्यागेल्याकडे माझी विचारपूस करूं लागला. मला वरतीं यायला बराच वेळ लागेल हें कळल्यावर माझी अडचण होऊं नये म्हणून खालीं येण्याची धडपड करूं लागला. त्याचा निरोप घेतांना मला फार जड गेलं. मी माझी छत्री आणि इतर कांहीं वस्तू त्याला माझी आठवण म्हणून दिल्या.

प्र.:–आपला एकूण दैनंदिन कार्यक्रम सांगाल काय ?

डॉ.:–एकूण आमच्या मोहीमेचा कार्यक्रम सांगतो. ही मोहीम साधारणपणें तीन टप्प्यांत विभागली जाते. We started from Jaynagar in Bihar. फेब्रुवारी २६ ला टीम निघाली. जयनगर ते बेस कॅम्प ह्याला म्हणतात 'ॲप्रोच मार्च' (Approach March) दुसरा टप्पा–गिर्यारोहणाचा व तिसरा रिटर्न मार्च (Return March)–Base Camp to खाटमांडू. साधारणपणें ५–३० ला आम्हीं चालायला सुरुवात करीत असूं. साधारणपणें दहा ते बारा मैलांचे चालणें रोज व्हायचे. कधीं ब्रेकफास्ट घेऊन मोर्च्यास सुरुवात, तर कधीं ब्रेकफास्ट मोर्च्यांत वाटेवर. कधीं कधीं ब्रेकफॉस्ट व लंच एकत्र–त्याला ब्रॅन्च असें म्हणतात ! एरव्ही लंच बहुधा मोर्च्यांवरच ! सायंकाळचे जेवण आम्ही साधारणपणें ६।। वाजतां घेत असूं–सगळेजण एकत्र बसून !–आम्ही ॲल्युमिनियमच्या फोल्डींग टेबलखुर्च्या नेल्या होत्या. पावडर-दूध, दही, ताक सारें मिळत असे. But we were keen on दही ! कॉफी, कोको वगैरे सारे असे बरोबर !

प्र.:–अंधाराचे वेळीं दिव्यावगैरेंची काय व्यवस्था होती ?

डॉ.:– Mess tent मध्यें एकूण आठ माणसें राहूं शकत असत. तेथें आम्हीं पेट्रोमॅक्स वापरीत होतो. लहानशा तंबूत (दोन माणसें) मात्र मेणबत्त्या, कंदिल यांचा वापर केला जात असे.

प्र.:–जेवणाची व्यवस्था कशी काय होती ? चॉइस होता ?

डॉ.:–व्यवस्था उत्तम होती. सुरुवातीलाच साऱ्यांना आपापली आवड कळविण्यास सांगितलें होते. म्हैसूरच्या Central Food Technological Research institute मधून fruit powder, fruit juice sticks मिळविल्या होत्या. त्याशिवाय pre-cooked, dehydrated dishes (dhal, rice, mutton, potatoes, preserved parathas) नेल्या होत्या. Rice, पुलाव, मटण पुलाव, पीज पुलाव ह्या dishes आम्हांला मिळायच्या. एक small packet चार माणसांना पुरे. खिमा, चिकनच्या dishes सुद्धां मिळत असत. मला पालकभाजी आवडत नव्हती. मी तसे कळविले होते. Roasted chicken हा पदार्थ कॉमन होता.

प्र.:–तुमच्या आवडीचे पदार्थ बरोबर घेऊन गेलां होतांत ? नंतर घरच्या मंडळींनीं कांहीं पाठवले काय ?

डॉ.:–मी सोडे (सुकी कोलंबी) नेले होते. मिरच्यांचे लोणचे नेले होते. भुइमुगाची चटणीही नेली होती. तिला मंडळी 'रॉकेट' म्हणत असत (तिखटपणामुळें) हे सर्व पदार्थ २१,००० फुटापर्यंत जाऊन आले. खराब झाले नाहींत.

घरच्या मंडळींनीं मला चकल्या पाठविल्या होत्या. त्या साऱ्यांनीं मिळून खाल्ल्या. Air Mail नें खाटमांडूला आल्या व मग 'रनर' बरोबर माझ्याकडे आल्या.

प्र.:–अहो, चकल्या हिमालयावर पोहोंचल्या. मग पत्रें वगैरे येत असतीलच कीं !

डॉ.:–अहो, तोच आमचा सर्वांत मोठा दिलासा होता. दर दहा दिवसांनीं आम्हांला पत्रें येत. पत्रें आली कीं, मोठा आनंदीआनंद असे. सारे जण निरनिराळ्या कोंपऱ्यांत जाऊन आपापलीं पत्रें वाचीत असत. In coming Mail म्हणजे फार मोठें आकर्षण असे. मेलच्या दिवशीं पत्र आलं नाहीं कीं, जरा depressed वाटायचं. एवढंच कशाला मित्रमंडळींची पत्रं येऊन घरच्या मंडळींचं आलं नाहीं कीं, बेचैन व्हायचं. ह्याचं एक भावस्पर्शी उदाहरण:–आमच्यांतल्या एकाला तीन मेल्स–जवळ जवळ एक महिना–पत्र आलं नाहीं. तेव्हां त्याचा mood आणण्यासाठी मी माझी

कांहीं पत्रं त्याला वाचायला दिली. तेवढंच बरं वाटलं त्याला !

प्र.:–खाण्याबाबत आपण सांगितलेंत. 'पिण्या'बाबतचे काय ?

डॉ.:–आमच्या टीममध्यें आम्हीं दोन माणसें मद्याला शिवत नव्हतो. एक मी आणि दुसरा मेजर मूल्कराज. साधारणपणें १५,००० फुटांनंतर दारू पिणें योग्य नाहीं असें माझें वैद्यकीय मत मी साऱ्यांना सांगत असे. Alcohol, smoking encourage fros-bite असें मला ठाऊक होते. त्यामुळें साऱ्यांनीं बंधन पाळावे असें मला वाटे. Well, I tried my best, but could not do much.

प्र.:–काय हो डॉक्टरसाहेब, एवढ्या उंचीवर, थंडीत आपल्याला आंघोळीची गरज भासली ? कुणीं कुणीं याबाबतींत काय काय विक्रम केले ?

डॉ.:–१०,००० फुटावर गेल्यावर आंघोळीची गरज नाहीं असें माझें वैयक्तिक मत आहे. तें वैद्यकीयदृष्ट्या मी बनवलेलें आहे. त्याचें Scientific कारण असें कीं, the natural oils of the body are washed out due to bathing. त्यामुळें Sun burn, fros–biteचीही भीति असते.

प्र.:–तुम्हीं काय केलेंत आंघोळीबाबत ?

डॉ.:–मी स्वतः २२ फेब्रुवारीपासून ८ जूनपर्यंत आंघोळ अशी केली नाहीं. Base Camp मध्यें माणसें गरम पाण्यानें आंघोळ करीत. ह्याबाबतींत **सोनम ग्याट्सो** ह्यानें विक्रम केला. आमच्या पथकांत सर्वांत जास्त वेळां आंघोळ केली त्यानें ! त्यानें तर १७,००० फुटावर सुद्धां थंड पाण्यानें आंघोळ केली. Sponge bath कांहीं जण घेत. Dry towel मी वापरी. Anti fungus powder मी नेली होती. सरदारजीसुद्धां केस मोकळे करून साग्रसंगीत आंघोळ करीत. सरसू तेल, युडी कोलोन वगैरे आम्हीं नेलें होते.

प्र.:–आपला फुरसतीचा वेळ कसा काय जात असे ? मनोविनोदनाचे दृष्टीनें काय काय कार्यक्रम केले ?

डॉ.:–मी डॉक्टर असूनही मनोरंजन सदस्य होतो (Entertainment Member) मी बरोबर १०० एक पुस्तकें नेलीं होतीं. खेळांचे विविध प्रकार नेले होते. पत्ते (playing cards) नेली होती. रेडियो ट्रॅन्झिस्टर्स, माऊथ ऑर्गन्स, रेकॉर्डप्लेयर नेला होता, मेस टेंटमध्यें आठजण गडबड करीत झोपत. ह्या साऱ्या साधनांनीं योग्य ती साथ दिली.

प्र.:–मध्यंतरी २६,२०० फुटांपर्यंत मजल मारूनही प्रतिकूल हवामानामुळें साऱ्या पथकाला १५।२० दिवस Base Campला येऊन रहावें लागलें. त्या काळांत एक प्रकारचें frustration आलें असण्याची शक्यता संभवते. अशा काळांत पथकाचें एकूण Moral टिकण्यासाठीं 'तुम्हीं' काय केले ?

डॉ.:–आमचा नेता कोहली हा कल्पक होता. साऱ्यांना गिर्यारोहणाची संवय रहावी म्हणून तो गटागटानें साऱ्यांना निरनिराळ्या टेकड्यांवर पाठवी. त्यामुळें सारे 'फिट' रहात. उपनेता कुमार यानें एक वेगळीच शक्कल लढविली. त्यानें साऱ्यांना एक



# नव्या आशा, नव्या आकांक्षा

## ● हिमालयांतील शेर्पा !

**चालू शतकाच्या प्रारंभापासून आयोजित करण्यांत आलेल्या हिमालयांतील अनेक मोहिमांतील शूर शेर्पा जमात ही प्रमुख आधारस्तंभ. निग्रही, दृढनिश्चयी पण तितकीच प्रेमळ अशा ह्या शेर्पा जमातीच्या संपूर्ण सहकार्याविना हिमालयांतील कुठल्याही यशस्वी चढाईची कल्पनाही मनांत आणणें कठीण. म्हणूनच हिमालयांतील कोणत्याही स्वारीचा इतिहास शेर्पांच्या पराक्रमाचे पोवाडे गायल्याशिवाय पुरा होणं अशक्य.**

**ही साधी व सोधी जमात पूर्व नेपाळांतील सोलो व खुम्बु विभागांतील. हिमालय, ल्होत्से, नुप्त्से, पुमोरी, आमा दाबलाम ह्या पर्वतराशींच्या सांवलींत सुखानें नांदणारी. नामची बाजार हे शेर्पा-भूमीचं मध्यवर्ती ठिकाण.**

**बौद्ध धर्माच्या ह्या छोटया जमातीला एव्हरेस्टबद्दल अत्यंत आदरबुद्धि. अपार मेहनत, अमर्याद धमक व पर्वतांतील नाना प्रसंगाना पुरून उरणारी अलौकिक सहनशक्ति ह्याबद्दल शेर्पांची जगभर ख्याती. शेर्पाची बरीचशी मंडळी मुख्यत्वें शेतीचा व्यवसाय करणारी असली तरी कांहींनीं आतां व्यापाराकडेही लक्ष वळविले आहे. कांहींजण तर शतकापूर्वीच दार्जिलिंग येथें स्थायिक झाले आहेत.**

**परकीय मोहिमांतून ह्या शेर्पांची उंच वातावरणांतील भारवाहक म्हणून भरती होत आली आहे व त्यांनींही आपल्या अंगच्या गुणांनीं, शारीरिक सामर्थ्यानें दरवेळीं आपली निवड सार्थ करून दाखवली. प्रतिवर्षी ह्या क्षेत्रांत मोलाची प्रगती करून, दरवेळीं चढाईची अधिक मजल मारून, उंच वातावरणांतील उत्कृष्ट भारवाहक हा आपला लौकिक त्यांनीं दिवसेंदिवस वाढवला. ही कामगिरी बजावत असतांनाच त्यांच्यातील कित्येकांनीं डोंगरावरून घसरणाऱ्या हिमखडकाखालीं प्राण गमावले.**





१९६१ सालांतील जपानी मोहिमेतील ग्यालझेन नोर्बु व १९६२ सालांतील भारतीय मोहिमेतील नवांग त्शेरींग ही अगदी अलिकडची उदाहरणं.

गिर्यारोहणाच्या इतिहासांत स्वकर्तृत्वानें मानाची पानें पटकावणाऱ्या कित्येक शेर्पांपैकीं तेनसिंग नोर्के, नवांग गोम्बु, आंगकामी व फू दोरजी ही कांहीं ठळक नावं.

गिर्यारोहणांतील पराक्रमाची नवनवीन क्षितिजें गांठण्याची शेर्पांची योग्यता निःसंशय असली तरी गिर्यारोहणांतील अत्याधुनिक व प्रगत तांत्रिक ज्ञान आत्मसात केलेल्या शेर्पांची संख्या अगदी मोजकीच. शेर्पा क्लायम्बर्स असोसिएशन, दार्जिलिंग किंवा हिमालय सोसायटी, खाटमांडू ह्या संस्थांशीं नांवं नोंदविलेल्या शेर्पांची संख्या अवघी २५०. शेर्पा गिर्यारोहकांना उत्तेजन देण्यासाठीं, हिमालयन क्लबनें १९३५ सालापासून विशेष कर्तृत्वाच्या गौरवार्थ "टायगर बॅज" हे मानचिन्ह देण्याची प्रथा सुरू केली.

दिवसेंदिवस जनतेंत उत्पन्न होत जाणारं गिर्यारोहणाविषयींचें औत्सुक्य आणि वाढत जाणारी आवड ह्यामुळें जिकडे तिकडे बरेचसे क्लबस् स्थापन होत आहेत. त्यामुळें शेर्पांना प्रगतीच्या नवीन दिशा उपलब्ध होत आहेत. हिमालयन माऊन्टनियरींग इन्स्टिटयूटमध्यें अर्धा डझन शेर्पा मार्गदर्शक आहेत व ते हिवाळ्यांत देशांत निरनिराळ्या ठिकाणीं स्थानिक गिर्यारोहणाची शिबिरें चालवतात.

शेर्पांच्यासाठीं कल्याणकारी व प्रगतीच्या योजना आंखणें हे शेर्पा क्लायम्बर्स असोसिएशनचें प्रमुख कार्य. निरनिराळ्या मोहिमांसाठीं अत्यंत विश्वासू, प्रामाणिक व गिर्यारोहणांतील निरनिराळ्या संकटांशीं सुपरिचित अशा शेर्पांची निवड करण्याचे कामही ह्या असोसिएशननें वृढपणें अंगावर घेतले आहे. ह्याच अनुषंगानें पुरेसे मार्गदर्शक व उंच वातावरणांतील शेर्पा ह्यांना योग्य ते शिक्षण देण्याचा कार्यक्रम त्यांनीं हातीं घेतला.

जवळजवळ एक दशकापर्यंत शेर्पांना निरनिराळ्या मोहिमांतून क्षणजीवी प्रसिद्धी मिळाली. हिमालयन माऊन्टनियरींग इन्स्टिटयूटनें त्यांना नवीन वृष्टी दिली व त्यांच्या वंशपरंपरागत धंद्याला नवी मानमान्यता मिळून दिली. ह्या संस्थेंत काम करणारे शेर्पा आधुनिक सोयीनें युक्त अशा खेडचांत रहातात. शेर्पा क्लायम्बर्स असोसिएशनचा प्रतिनिधी हा ह्या संस्थेच्या कार्यकारी मंडळाचा स्वीकृत सभासद असतो. निवडक शेर्पांना प्रगत गिर्यारोहणाचं तांत्रिक शिक्षण मोफत देण्यांत येतं. ह्या संस्थेच्या निवासस्थानीं प्रवाशांच्या सोयीकरतां चालवण्यांत येणाऱ्या कॉफी हाऊसचें सर्व उत्पन्न शेर्पा क्लाइम्बर्स असोसिएशनला दिलं जातं. संस्थेच्या म्युझियमच्या प्रवेश–फीचा कांहीं भाग कर्मचाऱ्यांच्या–कीं ज्यांतले बरेचसे शेर्पा आहेत–उन्नतीसाठीं उपयोगांत आणण्यांत येतो.

"पूर्व दिव्य ज्यांचें" अशा ह्या हिमालयांतील सुपुत्रांना "रम्य भावी काल" लाभो ! •••

Ice Huts (Igloo) "इगलू" बनवायला सांगितला. त्या काळांत (मोहिमेच्या) ज्यांचे वाढदिवस येत होते त्याची नोंद घेण्याचे व ते साजरे होतील हें बघण्याचें काम एका क्वार्टर मास्टरकडे सोंपविले होतें. माझा वाढदिवस ह्या मोहीमेच्या काळांत आला होता. कोहलीनें ते लक्षांत ठेवून त्यादिवशीं पार्टी दिली. साऱ्या तंबूतून एकदम Happy birth-day Lala म्हणून आवाज आले व कोहलीनें मला एक नेपाळी ब्लॅंकेट भेट म्हणून दिलें. शिखांचे "वैशाखी' त्याच काळांत आली. पण त्या दिवशीं माणसें South Cole वर होती. व हवा अति प्रतिकूल होती.

प्र.:– ह्या मनोविनोदनांत नाच, गाणीं, जोक्स, सरदारजी जोक्स वगैरे चालत ?

डॉ.:–गाणीं, नाच नेहमीं चालत असे--डफ नेला होता. 'भांगडा' हा नृत्य प्रकार भलताच Popular होता. कुमार, चीमा वगैरे मंडळी फार Jolly आहेत. आम्हीं सरदारजी विनोदांचा भरपूर आस्वाद घेतला. रेलचेल उधळण चालली होती. सरदारजी सुद्धां त्यांत भाग घेत. खुद्द कोहलीनांच सरदारजी जोक्स सांगितल्या. माझ्या "बॉम्बे हिन्दी" चाही वराच उद्धार होई. विशेषतः माझ्या ओ भाय्, खालिपिली, फेंकाफेंक, ठोंकाठोंक, बंडल इत्यादि शब्द. नंतर मी त्यांना हीच मुंबईची हिन्दी असे ठांसून सांगत असे. व तुमची हिन्दी मुंबईत कोणालाही कळणं मुष्कील होऊन जाईल असं सांगत असे. नंतर नंतर माझ्या हिन्दीचाच बऱ्याच लोकांना सराव झाला. एकाला कुणीतरी Men only चे अंक पाठविले. मग त्यांतली स्त्रियांची ती चित्रें फाडून ती एकेकाच्या टेंटमध्यें त्याचें नांव लिहून लावण्यांत आली. My dear Kohli, Dear Cheema ह्या पद्धतीनें त्यावर लिहिलें होते "All the nudes were allotted to each & every member of the expedition." कधीं कधीं गंभीर स्वरूपाच्या चर्चासुद्धां होत असत. Ice fall at Mountaineering problems ह्या संबंधीं चर्चा चालत. गुरदयालसिंग हा तर भारतीय गिर्यारोहण चळवळीचा प्रणेता (Father of the Indian Mountaineering) म्हटला पाहिजे. १९४८ पासून तो गिर्यारोहण करीत आहे. त्यामुळें चर्चा खूप रंगत. बरेंच वादविवाद झाले पण भांडणं मात्र कधींच झाली नाहींत.

प्र.:–याचें कांहीं कारण सांगतां येईल काय ?

डॉ.:–मला वाटतें Pre-Everest Expedition (राथोंग) मध्यें आम्हीं सारें होतों. त्यामुळें सारे एकमेकांना चांगले परिचित होतो. प्रत्येकाचे दोष, स्वभावांतले वारकावे आधींच ठाऊक झाले होते. कुटुंब भावना उत्पन्न झाली होती. प्रत्येकाच्या Capacities बद्दल विश्वास होता. आम्हीं सारेजण एका टीम-स्पिरिटनें वागलो ह्याचें श्रेय कमांडर कोहली व कुमार ह्यांच्या नेतृत्वालाही आहे.

प्र.:–ह्या सर्व व्यवहारांत भाषेची अडचण कधीं आली नाहीं काय ?

डॉ.:–शेरपा, थोंडूप व बॅटमन ह्या लोकांशीं बोलतांना 'हिंदी'चा

अनुक्रमणिका






वापर होई. बाकी सारे आम्ही इंग्रजींत बोलत असूं. अडचण कधींच आली नाहीं.

प्र.:– Sleeping bags हा काय प्रकार होता? त्या कुणाच्याही कुणाला चालत? दिवसा सुद्धां तुम्हीं त्या वापरत होता?

डॉ.:–Sleeping bags ह्या विशिष्ट पक्ष्याच्या पंखांच्या आंतून उबदार अशा पिशव्या असत. थंडीपासून निवारण हा त्यांचा हेतु. कुणाच्याही कुणाला त्या चालत. अति वरच्या कॅम्पमधें चढणारे त्या मागें टाकून जात. पुढच्या कॅम्पवर त्यांना दुसरी मिळत असे. दिवसा हवा खराब असल्यास Air Mattress वर Sleeping bags मध्यें आम्हीं पडून रहात असूं. चेन ओढली कीं, काम संपलें.

प्र.:–हिमालयावर प्रकाश, वनस्पति, पक्षी याबद्दलची माहिती.

डॉ.:–२२,००० फूटापर्यंत गोरख वगैरे कांहीं पक्षी दिसतात. गोरख हा पक्षी म्हणजे सहा ते आठपट कावळा! कावळ्यासारखाच काळा! पण १५,००० फूटाचे वर वनस्पति वगैरे कांहीं नाहीं. जनावरें नाहींत. १७,००० फुटापर्यंत दगड, खडक दिसतात पुढें बर्फ पडतें–सारें बर्फमय.

प्र.:–हिमालयावरचा आपल्या दृष्टीनें असामान्य अनुभव ?

डॉ.:–एक दिवस रात्रीं ११ चे सुमारास मी माझ्या तंबूच्या बाहेर आलो. २१,३०० फूटावरच्या छावणींत मी होतो. रात्रीं बाहेर येतांच माझें लक्ष आकाशाकडे गेलें. आकाश निरभ्र होतें. संपूर्ण चंद्रबिंब आकाशांत विलसत होतें. त्या चंद्रबिंबाच्या प्रकाशांत मी वर पाहिलें. एका बाजूला एव्हरेस्ट व समोर ल्होत्से हीं दोन हिमशिखरें मी पाहिलीं. It was simply Heavenly! I think I will never forget it! मी सूर्यास्त-सूर्योदय पाहिला होता. पण पूर्ण चंद्राच्या प्रकाशांत मी एव्हरेस्ट प्रथमच पाहिला आणि मी ते सौंदर्य आकंठ प्यालो.

प्र.:–एव्हरेस्ट मोहिमेंत शेरपांची मदत खूप होते असें म्हणतात. शेरपांबद्दलचा आपला अनुभव काय ?

डॉ.:–वास्तविक ते Load carrying च (भारवाहक) करतात. परंतु तरी They are not considered as porters. त्याचं

[पृष्ठ ६४ वर पहा]

## विक्रमांचाही एव्हरेस्ट!

**मानवाच्या साहसवृत्तीला आव्हान देणाऱ्या निसर्गनिर्मित प्रतिस्पर्ध्यांत एव्हरेस्टचा क्रमांक पहिला. या अत्युच्च पर्वतशिखेवर पाऊल ठेवून भारतीय गिर्यारोहकांनीं तिचा नक्षा उतरविला. हा पराक्रम गाजवीत असतांनाच त्यांनीं अनेक नवे वैशिष्ट्यपूर्ण विक्रम प्रस्थापित केले. त्या विक्रमांची ही गाथा!**

☆ दिनांक २०, २२, २४ आणि २९ मे १९६५ ह्या रोजीं एकूण चार वेळां भारतीय पथकानें "सगर माथा जीत लिया." अतुलनीय विक्रम!

☆ भारतीय तुकडींतील आठ सदस्य व सहाय्यक शेर्पा सरदार फू दोरजी अशा एकाच तुकडीतील नऊ जणांनीं एकाच मोहिमेंत एव्हरेस्ट शिखर गांठलें.

☆ कॅ. अहलुवालिया, श्री. रावत व फू दोरजी अशा तिघांजणांच्या तुकडीचें एव्हरेस्टवर आरोहण. गिर्यारोहणाच्या इतिहासांत ह्यापूर्वी दोघांपेक्षां अधिक माणसं एकाच वेळीं जगांतील सर्वोच्च शिखरावर कधींही गेली नव्हती. एक नव्वा उच्चांक!

☆ एकाच मानवानें एव्हरेस्ट माथा दोनदां सर करण्याचा बहुमान नवांग गोम्बु ह्या सदस्यानें मिळवला. हें वैयक्तिक रेकॉर्ड!

☆ एकाच उपखंडाच्या दोन टोंकाहून आलेल्या–एक सिक्कीम व दुसरा लडाखहून— दोन "सोनमां"नी भारतीय व नेपाळी झेंडे एव्हरेस्टवर फडकवून नवाच इतिहास निर्माण केला. ह्यांतील सोमन वांग्याल (२३) हा आतांपर्यंतच्या शिखर चढणाऱ्यांत सर्वांत जवान तर सोनम ग्याट्सो (४२) हा "अभी तो मैं जवान हूं" असा सर्वांत वडिल! म्हणूनच "असाध्य तें साध्य" करणारी ही जोडीही आगळीच.

☆ भारतीय पथकानें शेवटचा तळ (रोज कॅम्प) २७,९३० फूटांवर ठोकला. आतांपर्यंत सर्वांत उंच!

☆ भारतीय संघानें शिखरावर पाय रोवण्याचा पहिला प्रयत्न आतांपर्यंतच्या लवकरांतला लवकर असा २७ एप्रिल रोजीं केला. निसर्गाच्या असहकारामुळें त्यांची निराशा होऊन, पण निरुत्साही, नाउमेद न होतां तात्पुरती माघार.

☆ दि. १२ एप्रिल रोजीं साऊथ कोलकडे मार्गक्रमण. आतांपर्यंतच्या मोहिमांत ह्या मोसमांत इतक्या आधीं कोणीही तळ ठोकला नव्हता!

☆ नऊ शेर्पांचा ४० पौंड ओझं वाहून ह्यापूर्वीच्या मोहिमांपेक्षांही अधिक लवकर म्हणजे दिनांक १६ एप्रिल रोजीं साऊथ कोल गांठण्याचा विक्रम. दि. १८ एप्रिल रोजीं ह्या विक्रमाची पुनरावृत्ती.

☆ हिमखंडाच्या माथ्यावर सर्वात प्रथम मजल. दिनांक २७ मार्च रोजीं. दिनांक ३ एप्रिल रोजीं केवळ ल्होत्से फेस सर केले नाहीं, तर २५,००० फूटांवरील कॅम्प चार तळ साधनसामुग्रीनें सज्ज करण्यांत आला. वेळेच्या दृष्टीनें पूर्वीच्या मोहिमांवर विक्रमशाली मात.

☆ सर्वांत अखेरचा पण अत्यंत महत्त्वाचा विक्रम. कुठल्याही प्रकारची अनिष्ठापत्ती, प्राणहानी न होतां निर्भेळ यश पदरीं घेऊन सुखरूपपणें परतलेलं हेंच बहुधा एकमेव पथक! आणि तेंहि सर्वस्वी भारतीय, म्हणून अधिक कौतुकास्पद! ●●●



"आज जिंकला सगरमाथा" असं अभिमानास्पद लाला तेलंग एम्. डी. ह्यांचा गौरवपूर्ण उल्लेख केला एव्हरेस्ट मोहिमेच्या चांचणीसाठीं ते खास हिंदुस्थानांत आपल्या मुलाची एव्हरेस्ट मोहिम पथकांतील मानानं उचंबळून आले तरी, आपल्या एकुलत्या एका निसर्गाच्या प्रकोपाशीं सामना द्यावा लागेल ह्या जाणीवेनं बंधूराज व एव्हरेस्ट पथकांतील इतर सदस्य ह्यांची एव्हरेस्ट घोष एम्. डी. ह्यांनीं आपल्या मातोश्रीस दिलासा

# दुरून डोंगर साजरे!

न्यू दिल्ली.
१५-२-१९६५.

प्रिय सौ. आईस,

सप्रेम नमस्कार.

लाला व सौ. सुलू व्यवस्थित पोंचल्याबद्दल काल मी फोन केलाच आहे. लालानें एव्हरेस्ट मोहिमेसाठीं बरोबर आणलेले सर्व सामान, औषधें वगैरे चांगल्या रीतीनें पोंचले. आतां दिल्लींत त्यांच्या मोहिमेच्या सामानाची बांधाबांध चालू आहे, ती आम्हीं काल दुपारीं पहाण्यास गेलो होतो. वारंवार तुझी नि बाबांची आठवण झाली. तुम्हीं ती तयारी बघायला हवी होती, म्हणजे तुझी भीति बऱ्याच अंशानें कमी झाली असती. गिर्यारोहणाचं शास्त्र एवढं प्रगत झालेलं असेल ह्याची आम्हांला कल्पनाच नव्हती!

वारे व थंडी ह्यांपासून संरक्षण करणारे (Windproof) कपडे, निरनिराळ्या तऱ्हेचे हातमोजे, बर्फावरून चालण्याकरितां विशिष्ट तऱ्हेच्या हातांतल्या काठ्या, हिमखंड पार करण्यासाठीं अल्युमिनीयम् व दोरीच्या शिड्या, टणक बर्फातून वाटचाल करतांना पाय घट्ट रोंवण्यासाठीं बुटाला बांधावयाचे अणकुचीदार टोंकाचे खिळे (crampons), बर्फात व दगडांत ठोकण्यासाठीं पांच सहा प्रकारचे शेंकड्यांनीं खिळे अशा किती तरी वस्तू! स्पेशल नॉयलॉनच्या दोऱ्या. ऐन संकटांत उपयोगी पडणारी एक लहानशी पण नवलाईची गोष्ट पाहिली. लोखंडाची एक मूठ असते. त्याच्या वरच्या बाजूला चाप (Lock) तर खालच्या टोंकाला दोरी. ह्या उपकरणाचा उपयोग वर चढतांना करतां येण्यासारखा असतो तो असा. गिर्यारोहण करतांना, एखाद्या कड्याच्या वर पासून खालीं अशी पूर्वनियोजित जोडलेली दोरी ह्या मुठीचा चाप उघडून त्यांत अडकवायची व मुठीच्या खालच्या टोंकाची दोरी स्वतःच्या कमरेभोंवती बांधायची. गिर्यारोहक जसजसा वर जातो, तसतशी ही मूठही मूळच्या दोरीवर हातानें सरकावतो. मुठीचा चाप मूळ दोरीला घट्ट घोरपडीसारखा पकडून ठेवतो. मध्येंच हात सुटून, तोल जाऊन किंवा कांहीं अपघात होऊन माणूस फार उंचावरून खालीं कोसळण्याचा धोका उत्पन्न झालाच तर, मूळ दोरीपासून खालच्या बाजूला न निसटणाऱ्या चापामुळें गिर्यारोहक मधल्या-मधेंच लोंबकळत रहातो. प्राण संकटांतून वांचवणाऱ्या ह्या छोट्या उपकरणाचं नांव Jumar rescue device! अशा बऱ्याच इतर नवीन गोष्टी पाहिल्या. ह्यांतल्या कांहीं गोष्टी फ्रान्स व अमेरिकेहून एव्हरेस्ट मोहिमेसाठीं खास मागवलेल्या आहेत.

गिर्यारोहकांनीं पाठीवर घ्यायची पोतडी (ruck sack) तुम्हीं आतापर्यंत जड खाकी कपड्याची बघितली होती. पण आतां ह्या मोहिमेकरितां ती तशी नसून, खास नॉयलॉन कपड्याची बनविली आहे. व पाठीवर ठीक तऱ्हेनें बसवण्याकरितां अल्युमिनीयम्ची खास फ्रेम करून घेतली आहे. म्हणजे त्यांचा रक्सॅक इतका हलका झाला आहे कीं, विचारूं नकोस. लहान मुलांनाही पाठीवर घालून मिरवण्याचा मोह पडावा!

त्यांचे तंबूही नॉयलॉनचेच बनवलेले आहेत—थोडेसे परदेशी व बाकीचे इथेंच तयार केलेले! त्यामुळें रंगीबेरंगी छान वातावरण निर्माण झालं आहे. त्यांनीं प्रत्येक तंबू उभारून, चांचणी घेऊन पाहिली. तंबूंत शिरल्यावर बंद करायला "झिप"ची व्यवस्था आहे. हवा भरली कीं, सगळी गादी झोंपायला तय्यार, अशा हवाबंद गाद्या.

यश मिळविणारी व्यक्ति म्हणून डॉ. दत्तात्रय वामन उर्फ पाहिजे. अमेरिकेंत वद्यकीय नोकरी करत असतांनासुद्धां आले. हौसेला मोल नसतं ते हे असं !
डॉक्टर म्हणून निवड झालेली पाहून मातेचं हृदय अभि-मुलाला एव्हरेस्ट मोहिमेंत इंचाइंचावर प्राणाशीं खेळणाऱ्या तिचं मन व्याकुळ होणंही सहाजिकच. दिल्लींत आपले मोहिमेची जय्यत तयारी जातीनें पाहून डॉ. सौ. मंजुळा देणारं लिहिलेलं हें पत्र .........

---

(Air mattresses). त्या शिवाय अति थंड हवेच्या प्रदेशांतील "डाऊन" (Down) नांवाच्या पक्षांच्या पिसांपासून तयार केलेली, अतिशय हलकी व अत्यंत उबदार अशी Sleeping bag ! ह्याच पिसांपासून बनविलेला अत्यंत आकर्षक असा सूट—उंच वातावरणांत अत्यंत कडक थंडीपासून संरक्षण करण्याकरतां सतत वापरण्यांत येतो ! वर लिहिलेल्या सर्व गोष्टी प्रत्येकाकरतां एक एक वेगळ्या आहेत. त्याशिवाय तीन-तीन रंगीबेरंगी वुलन शर्टस्, इंग्लिश गॅबरडीनची—जी वॉटरप्रुफ, क्रीजप्रुफ व गरम असते अशी—पॅन्ट. १० Ply लोंकरीचा पुऱ्या बाहीचा व कॉलरचा स्वेटर, दोन तऱ्हेचे टॉर्चेस, एक प्लेट, प्रत्येकाचं नांव कोरलेला एक मोठा पेला (mug), एक प्लॅस्टिकची पिशवी की ज्यांत टुथब्रश व पेस्ट, साबण, कंगवा, व्हॅसलीन, नेलकटर, चाकू, रुमाल आणि इतर कितीतरी लहानसहान गोष्टी आहेत. ह्या सर्व गोष्टी प्रत्येकाच्या रकसॅकमध्यें व्यवस्थित ठेवल्या जातील. म्हणजे स्वत:चं वेगळं असं कांहींच सामान घेण्याची आवश्यकता नाहीं.

उंच वातावरणांत (altitude) वापरण्यासाठीं ऑक्सिजन सिलेंडर्स व मुखवटे (masks)—ह्या गोष्टी खास फ्रान्सहून मागवल्या आहेत. हिम अंधत्वापासून संरक्षण करणारे, निरनिराळ्या उंचीवर वापरण्याजोगे दोन तीन प्रकारचे गॉगल्स्, बर्फावरून चालण्यासाठीं स्पेशल बूट, बर्फात बूट भिजूं नयेत म्हणून त्यावर घालायची कव्हर्स, दिवसाचे बूट काढून रात्रीं झोंपतांना घालायचे लोंकरीचे बूट, २५,००० फुटांच्या वरती वापरण्यासाठीं रेनडियर प्राण्याच्या कातडी-पासून बनवलेले बूट—त्याच्या लवीसकट ! — अशा कित्येक नवीन गोष्टी पाहिल्या. असं आहे हे साधनसामुग्री दालन (Equipment department).

नंतर आम्हीं खाद्यपेय विभाग (Catering department) पाहिला. खाद्यपदार्थ डब्यांत (tins) आणि प्लॅस्टिक पॅकेटस्‌मध्यें घालून ठेवलेले आहेत. बऱ्याच गोष्टी खास संरक्षणदलाच्या प्रयोगशाळेंत तयार झालेल्या आहेत. उदा. निर्जल केलेल्या (dehydrated) कोंबड्या, अंडीं, मासळी, डाळी, भाज्या, क्रीम, लोणी, दुधाची पावडर इत्यादि. हे सर्व पदार्थ त्यांनीं खोक्यांत अशा तऱ्हेनें भरलेले आहेत कीं, रोज दोन खोके उघडले कीं, जवळ जवळ ४०।५० शेर्पा लोक व २० ऑफिसर्स ह्यांचं एक दिवसांचं जेवण सहज बनवतां यावं ! प्रत्येक जेवण प्रत्येकाला ५००० कॅलरीज देणार आहेत. हातावरील तळव्याच्या आकाराचा व एका बोटाएवढ्या जाडीचा एका विशिष्ट चॉकलेटचा चौकोनी तुकडा (Slab) त्यांनीं आम्हांस खाण्यास दिला. ह्या चॉकलेटची गंमत अशी कीं, एक तुकडा खाल्ला कीं, त्यांतून एका जेवणाएवढ्या कॅलरीज मिळतात. चॉकलेटचे असले तुकडे ती मंडळी जेव्हां मोर्चावर असतात तेव्हां त्यांना दिलीं जातात. खायला फारच रुचकर पण पचायला अतिशय कठीण ! फळांचे व फळांच्या रसांचे अनेक हवाबंद डबे. पर्वतावर हेंच त्यांचं प्रमुख अन्न ! हे सर्व पाहून त्यांच्या एकंदर जय्यत तयारीची वरीचशी कल्पना आम्हांला आली.

केरोसिनचे शेंकड्यांनीं प्लॅस्टिक डबे, प्लॅस्टिकच्या बादल्या, टब्स्, थर्मास फ्लास्कस्, सिगरेटी, आगपेटचा इत्यादि जवळजवळ सगळ्याच गोष्टींचा पुरवठा आहे.

अगदीं नवीन अशी पाहिलेली वस्तु म्हणजे रासायनिक पिशव्या—Chemical heaters ! ह्या गोष्टी जपानी आहेत. एक लहान आकाराची प्लॅस्टिकची पिशवी असते व त्यांत विशिष्ट तऱ्हेची पावडर असते. पिशवींत थंड पाणी घातलं कीं, ते पाणी थोड्याच वेळांत गरम होते. व जवळजवळ २४ तास ते तसेंच गरम रहाते. शरीराच्या कुठल्याहि भागाला थंडी लागून दुखूं लागलं कीं, ह्या प्लॅस्टिकच्या पिशवीनें त्याला छानपैकीं शेक देतां येतो. अथवा शरीराला नुसतीच उब पाहिजे असेल तर आंतल्या दोन बाजूंच्या दोन खिशांत ह्या पिशव्या ठेवून दिल्या कीं, आली उब शरीराला ! नको असेल तेव्हां पिशवींतले पाणी ओतून टाकायचं ! अशा रीतीनें एक पिशवी चार वेळां पाणी घालून वापरतां येते. त्यानंतर तिची उब जाते. दुसरी एक तऱ्हा सिगरेटसारखी आहे. ती पेटवून विशिष्ट तऱ्हेच्या डबींत ठेवायची व ती डबी खिशांत ठेवली कीं, जवळजवळ १२ ते १८ तास त्याची उब रहाते. अशा तऱ्हेच्या पिशव्या व सिग-रेटच्या आकाराच्या काड्या कितीतरी शेंकड्यांनीं त्यांनीं बरोबर घेतलेल्या आहेत !

चार दिवस झाले सामानाची बांधाबांध सुरू आहे. काम अत्यंत शिस्तीनें व व्यवस्थित दिवसरात्र होत आहे. आणखी तीन चार दिवसांत सारं पुरं होईल. लीडर कोहलीपासून ते सामा-नाची बांधाबांध करणारे कांहीं शेरपा लोक आहेत, त्या सर्वांनाच लाला आवडतो हें आम्हीं पाहिले. ह्या मंडळींनीं आपल्या बाजूनें, मनुष्यजातीकडून जेवढी बचावाची, संरक्षणाची तयारी ठेवतां येण्यासारखी आहे तेवढी ठेवली आहे. त्यानंतर जर निसर्गाचाच कोप होऊन कांहींतरी अपघात झाला तर नाईलाज आहे !

त्यांची ही सगळी जय्यत तयारी पाहून मुलंसुद्धां बेहोष झाली आहेत. "हे" म्हणतात कीं, आपल्याला दहा हजार रुपये बक्षीस दिले व पालखीतून उचलून जरी कोणी एव्हरेस्टवर नेतो म्हटलं तरी कांहीं आपण जाणार नाहीं. आपल्याच्यानें हे असलं कांहीं होणार नाहीं म्हणून सांगूं लागले तेव्हां हंसून हंसून पुरेवाट झाली साऱ्यांची !

तूं आणि बाबा लाला इथून मोहिमेवर जायच्या दिवशीं पंढर-पूरांत विठोबाच्या चरणाशीं असणार, त्यामुळें तुमच्या मनाला खूपच बरें वाटेल असें वाटतें. उगीच तूं घाबरूं नकोस. आतांच्या काळांत साधं रस्त्यावरून चालणाऱ्या मनुष्यालासुद्धां किती भीति असते अपघाताची ! देवाची वसती असूनही, रामेश्वरला काय झालं तें बघितलंस ना ? देवदयेनें ते सगळे व्यवस्थित परत येणार. तूं कांहीं काळजी करूं नकोस !

ति. बाबांना नमस्कार.

तुझी,
सौ. ताई.








ज्याचा शेवट गोड तें सारेच गोड. असं असलं तरी कुठल्याही कार्यांत अंतिम मिळणाऱ्या यशाशीं आंबट-गोड स्मृति नेहमीच निगडीत असतात. **डॉ. लाला तेलंग ह्यांच्या यशयात्रेंतील** ही अशीच छोटीशी पण बरंच कांहींतरी सांगणारी स्मृतिचित्रें ........

# कांहीं क्षण....कांहीं कण

–मनोहर वागळे

**काळ : १९६० स्थळ : मुंबई. वेळ : रात्रीं जेवणाची.**

"बाबा, मी बेसिक कोर्ससाठीं दार्जिलिंगला जाणार आहे."

"हे खूळ तुझ्या डोक्यांत कुठून शिरलं काहीं कळत नाही. दिवसें-दिवस वाढतच चाललय्."

थोडी स्तब्धता.

"पण तुला माऊन्टनियरिंग करून काय मिळतं ?"

"काय मिळतं हे सांगणं कठीण आहे बाबा. सुमा नाटकांत कामं करते, गाणं शिकते. काय मिळतं तिला ? मी सकाळचा रोज धांवायला जात असे. त्यावेळीं कॉलेजची मुलं विचारीत—काय मिळतं तुला रनिंग करून ?"

परत स्तब्धता.

"दुसरे स्पोर्टस् नाहीत कां तुला ?"

"ते मी खेळतोच कीं—बॅडमिंग्टन, स्विमींग वगैरे ? मग तुमचा ह्यालाच कां विरोध ?"

"अरे हा धोक्याचा खेळ आहे !"

"तुम्हांला वाटतो तितका धोका नसतो त्यांत बाबा ! कल्पना नसल्यामुळें उगाच तुम्ही घाबरता आहांत झालं. तसं बघायला गेलं तर धोका नाही कुठं ? आतां तुम्ही परदेशच्या दौऱ्यावर आहांत. सगळा प्रवासच मुळी विमानाचा. त्यांत काय कमी धोका आहे ?"

बराच वेळ शांतता.

कधींच न संपणारा पण कुठेतरी थांबावा असा वाटणारा हा संवाद. मुलाचे विचार बुद्धिला कळले तरी मनाला न वळल्यामुळें, समजूत पटत नव्हती वडिलांची. नि आपल्या तर्कशुद्ध विचारांनी समजूत घालत होता त्यांचा मुलगा !

☆ ☆ ☆

**काळ : सप्टेंबर १९६४ स्थळ : मुंबई.**

मुलाचं अमेरिकेहून आलेलं पत्र. "प्रिय बाबा, मला एव्हरेस्टच्या चांचणीसाठीं आमंत्रण आलंय्. एव्हरेस्टवर जाण्याची कुठल्याही गिर्यारोहकाची असते तशीच माझीही महत्त्वाकांक्षा आहे. माझ्या आयुष्यांत येणारी ही सुवर्णसंधी. तुमच्या संमती शिवाय मी होकार दिला आहे. क्षमा कराल ही अपेक्षा...."

अमेरिकेला गेल्यावर तरी ह्याच्या डोक्यातलं खूळ कमी होईलसं वाटलं होतं. लवकर एकदांची परिक्षा देऊन मार्गाला लागला असता म्हणजे मी निश्चिंत झालो असतो. एफ्. आर. सी. एस्. च्या ऐवजी एव्हरेस्टचं काय वेड घेतलं पोरानं ! सुलूनं तरी कशी परवानगी दिली कळत नाही. वडिलांचं खरमरीत पत्र.

ते पत्र आई वाचते. तिचं मन द्रवतं. लगेच दुसऱ्या डाकेनं तिचं पत्र. "लाला, ह्यांनीं पत्रांत लिहिलेल्या गोष्टी तूं विसरून जा. तुझ्याबद्दल वाटणाऱ्या मायेच्या पोटी त्यांनी लिहिलंय्. तूं खुशाल एव्हरेस्टवर जा. आमचा तुला आशिर्वाद आहे...."

★ ★ ★

**काळ : २२ फेब्रुवारी १९६५ स्थळ : पंढरपूर विठ्ठल मंदिर. वेळ : सकाळ.**

आज लाला एव्हरेस्ट मोहिमेवर जायला निघणार. वास्तविक आम्ही दिल्लीला त्याला निरोप द्यायला असायला हवं होतं. पण आम्ही आज विठ्ठलाच्या चरणापाशीं आहोंत त्याची करुणा भाकत. विठ्ठला विठ्ठला लालाला यश दे. त्या सर्वांना सुखरूपपणें परत आण—तो गोम्बु, तो कुमार आणि इतर—मला ज्ञात किंवा अज्ञात. सगळे मला लालासारखेच !

त्या दिवसांपासून आईनें कडक व्रतवैकल्यें स्वीकारली आपल्या वयाला न झेंपणारी, शरीराला न पेलणारी, व्याधीला न मानवणारी. डॉक्टरी सल्ला झुगारून ! अत्यंत व्रतस्थपणें पण तितक्याच सश्रद्ध भावनेनं ती देवाला सांकडं घालायला लागली. वाडवडिलांच्या पुण्याईला आळवूं लागली. ध्यास एकच—माझा एकुलता एक लाला यशस्वी होऊन सुखरूप येऊं दे ! ज्याचं कुलदैवत शंकर तो माझा लाला गौरीशंकराच्या भेटीला चाललाय्. ही भेट सफल होईल की नाही हीच चिंता !

★ ★ ★

**काळ : २३ जून १९६५. स्थळ : दिल्ली वेळ : दुपारच्या जेवणाची**

लाला विजयी होऊन परत आल्यामुळें घरांत आनंदी आनंद. त्यानें

[ **पान ६० वर पहा** ]





--भास्कर उत्तरवार

**"आज** आपल्या लग्नाचा पंधरावा वाढ-दिवस."

"हं ! पंधरा वर्षं कशी रखडत गेलीं."

"काढली !"

"बरेच उदास दिसतां आज."

"गेल्या चौदा प्रसंगीं एवढं उदासवाणं वाटलं नाहीं."

"मग आजच ?"

"हं ! आज अचानक जुनी जखम वहायला लागली आहे."

"जखम ?"

"होय. गेलीं पंधरा वर्षं लपविलेली भयानक जखम."

"झाल्या गोष्टीचा आजच्या दिवशींच उल्लेख करायला हवा ?"

"वय वाढल्याची जाणीव होत आहे. पूर्वीचा मनावरचा ताबा राहिला नाहीं संध्याकाळच्या चाहुलीनं धीर सुटूं पाहत आहे."

"गेलीं पंधरा वर्षं धरलेला धीर आज सोडतां आहांत ?"

"हं ! आज म्हातारपणाची अचानक जाणीव झाली आहे."

"पण आज त्या गोष्टी काढूं नका. मला आवडणार नाहींत."

"मला तरी कधीं आवडल्या आहेत ?"

"मग विषय बदललेला बरा."

"नाहीं. आज मला बोलायचं आहे."

"आणि सारी घाण ओकायची आहे ?"

"अति मळमळायला लागलं म्हणजे ओकणंच बरं असतं."

"आणि मग माझाहि तोल राहणार नाहीं. गेलीं पंधरा वर्षं सांभाळलेला तोल

तो उपभोग जाणत होता. त्याची ओळख होती फक्त शरीराशीं आणि शरीराशींच ! पण एक भोगलेल्या शरीरानेंच त्याला खोड्यांत अडकवून टाकलें. त्याची ही बोलकी झालेली खंत—वेगळ्याच ढंगानें लिहिलेली—

एका प्रसंगानं घालवणं मला आवडणार नाहीं."

"मला त्याची पर्वा नाहीं. गळूं फार ठणकायला लागलं आहे. ठणका आता सहन होत नाहीं. पिळायला हवं आहे."

"मला घाणीची शिसारी आहे."

"तुझ्यासारखीनं घाणीबद्दल शिसारी सांगूं नये. शोभणार नाहीं."

"हूं ! शोभण्या न शोभण्याचा विचार मी कधीं फारसा केलेला नाहीं. आज तर मुळींच करणार नाहीं."

"संध्याकाळची सांवली पडली म्हणजे बेडर माणूसहि आसरा शोधायला लागतो."

"सारींच माणसं तुमच्यासारखी भित्री नसतात."

"भित्रेपणाची जाणीव होत नाहीं तोंपर्यंतच ह्या वल्गना."

"हें तुम्ही सांगावं मला ?"

"समाधान शोधण्याचा प्रयत्न करतो आहे."

"समाधान ? हं ! अनोळखी गोष्टींबद्दल बोलूं नये माणसानं."

"खरं बोललीस. पण कधी कधी अरूप कल्पनेंत चघळावसं वाटतं. तेवढाच विरंगुळा वाटतो."

"विरंगुळयासाठीं कल्पनेतलंच अरूप कशाला हवं ?"

"मग दुसरं काय आहे हातीं ?"

"कां ? गेलीं पंधरा वर्षे जीवाभावानं सोबत केली कीं तुमची. हें अरूप नाहीं ?"

"तुझी सोबत ?"

"कां ? कधी शंका घेण्यालायक घडलं गेल्या पंधरा वर्षांत ?"

"नाहीं. म्हणूनच तोहि एक सलच झाला आहे."

"तुमची निष्ठेनं साथ केली."

"निष्ठा ? हंसावंसं वाटतं ह्या शब्दाला. सडलेला अर्थ घेऊन वळवळणारा शब्द ! त्याचं कौतुक तूं सांगणार ?"

"मी त्याचं कौतुकच मानलं आहे. तुमच्याकडून तशी कधींच अपेक्षा नव्हती."

"तुला माझ्याकडून कसली अपेक्षा करण्याचं प्रयोजन तरी काय ?"

"पति पत्नी म्हणून गेलीं पंधरा वर्षे एकत्र राहण्याचं प्रयोजन तरी कळलेलं आहे तुम्हांला कधी ?"

"नाहीं. एकच प्रयोजन कळलं होतं आयुष्यांत. पण त्याची सीमारेषा पहिल्या अक्षतेच्या दाण्याबरोबरच संपली !"

"विषयांतर करूं देणार नाहीं मी तुम्हांला."

"सल काढायचा आहे मला. तुझ्या निवडीनं बोलणार नाहीं."

"सल ! सल तुम्हांलाच तेवढा नाहीं."

"माहित आहे मला."

"मग त्यावर बोलूं नका."

"बोलायलाच हवं. तुझ्यापेक्षां मी फार लवकर थकलो. इतक्या लवकर थकायला नको होतं मला."

"कां बेडरपणा इतक्या लवकर संपला ?"

"संपला. हळूहळूं पाय घांसत घांसत संपला. आता शेवटची धुगधुगी तेवढी राहिली आहे आणि अजून बराच प्रवास राहिला आहे."

"हं ! पण अजून मी थकले नाहीं. अजून माझ्यावर माझा विश्वास आहे."

"माहित आहे. म्हणूनच माझी स्वतःची मला भीति वाटायला लागली आहे."

"तुम्हीं असं बोलावं आणि मी तुमची कींव करावी; असं वाटतं तुम्हांला ?"

"नाहीं. तुझी कींव आणि किळस वेगळी नाहीं हें माहित आहे मला."

"उद्धारकर्त्याबद्दल किळस बाळगावी एवढी कृतघ्न नाहीं मी."

"उपरोधानं बोलूं नकोस."

"हूं ! बोलूं नको ? तुमच्या शब्दांशब्दांतून वळवळता उपरोध बाहेर पडतो आहे. त्याचे डंख मारून घ्यायला तेवढी अगतिक झाले नाहीं मी."

"तूं आणि अगतिक ! भक्ष्यावर क्रूरपणानं झडप घालणारी वाघीण कल्पनेंतहि अगतिक ठरणार नाहीं."

"भक्ष्य समजायला लागलांत स्वतःला ?"

"होय. भक्ष्य ! हरिणींच्या कळपांत बेगुमानपणें वावरणाऱ्या काळविटाचा घरून बांधून केलेला मारा. रक्ताला चटावलेल्या वाघिणीपुढं टाकायला."

"आणि त्यावर मी झेंप टाकली. त्याला ठार केलं; असंच ना?"

"नाहीं. पहिल्याच झेंपेंत संपविलं असतंस तर फार बरं झालं असतं. पण स्वतःच्या गळ्याला बांधून पंधरा वर्षे क्रूरपणानं खेळ खेळत रखडत ओढलंस. शहारे येतात."

"केवढं सफाईनं खोटं बोलतां ?"

"खोटं बोलतां आलं असतं तर फार बरं झालं असतं. त्या कोषांत गुरफटून जीवनाचा अर्थ शोधीत फिरलो असतो. पण तें जुळलं नाहीं कधींच. तीहि व्यथाच !"

"हूं ! नुसतीच दुर्बलता आली नाहीं तुमच्यांत. शरीरावर लूतहि उठायला लागली आहे तुमच्या."

"बरोबर आहे. अशीच लूत उठावी आणि तुला गळ्यांत बांधून आणखी पंधरा वर्षे काढावी."

"तुमचं तोंड प्रमाणाबाहेर बरबटलं आहे घाणीनं."

"पुन्हां घाण. घाण तूं सांगावीस मला ? ज्या दिवशीं पिवळे हात करून बसलीस माझ्यापुढं त्यावेळीं काय होती तुझ्या हाताला ?"

"ती सुद्धां तुमचीच."

"हं ! थोबाडांत मारायची शक्ती सुद्धां राहिली नाहीं माझ्यांत"

"कां पंधरा वर्षांपूर्वीचं बेदरकार जीवन संपलं इतक्या लवकर ?"

"संपलं. जिवंत राहिलों हें नशीब."

"आणि तुम्हीं बाटविलेल्या पोरी जिवंत







## अंदमानच्या अंधेरीतून

**१९११ सालीं पंचम जॉर्ज बादशहाच्या राज्यारोहणा निमित्त दिल्ली दरबार भरणार होता. त्या निमित्तानें सारे राजबंदी सुटणार अशा वार्ता सर्वत्र पसरल्या. अंदमानच्या अंधेरीत खिचपत पडलेल्या साऱ्या क्रांतिकारकांना वाटले आपलीही मुक्तता होणार. साऱ्यांना सुट वाचून दाखविण्यांत आली. पण त्यांत स्वातंत्र्यवीर सावरकरांचें नांव नव्हते. बाबांना धक्का बसला "त्याला सुट नाहीं तर !" असा विचार त्यांना अस्वस्थ करूं लागला. राज्यारोहण आले, गेले. राजबंद्यांच्या संपानंतर कांहीं राजबंद्यांना बाहेर कामावर धाडीत. पण तीं कामें इतकीं ऊर फोडणारीं असत कीं, तीं करतांना अनेकांनी "जीवनाशाच सोडून दिली. इंदुभूषण रॉय चौधरी ह्या तरुणानें कोलूचे राक्षसी काम संपत नाहीं असें पाहून एक दिवस गळफास लावून आत्महत्या करून घेतली.**

राहिल्यात ह्याचा हिशेब त्यावेळीं कधीं केला होतांत ?"

"त्यावेळीं गरज वाटली नाहीं."

"कशी वाटेल ? बेछूटपणानं खड्ग चालविणारें लक्ष्मण होतां ना तुम्हीं !"

"मूर्ख पोरींना खड्गाच्या धारेवर चिरणं ह्याशिवाय दुसरं कांहींच जाणलं नाहीं मी त्यावेळीं."

"पण तुम्हांला भेटलेल्या साऱ्याच पोरी मूर्ख नव्हत्या. निदान तुम्हीं समजत होता तेवढ्या."

"त्याचंच प्रायश्चित भोगतो आहे."

"प्रायश्चित ! प्रायश्चितानं पावन होतो माणूस. आज पंधरा वर्षांनंतर माझ्या निष्ठेचा तुम्हीं ज्या पद्धतीनं उल्लेख केलांत त्यावरून तुमचं मन अजूनहि पापी असल्याचं दिसतं; घाणेरडं असल्याचं असतं."

"पुन्हां निष्ठेबद्दल बोललीस. गणिकेचं हें पातिव्रत्याचं सोंग माझ्यापुढें तरी आणूं नकोस."

"घाणेरड्या माणसा ! माझ्या पूर्वपुण्याचं स्मरण देऊन हें घर विटाळूं नकोस."

"मला घाणेरडा म्हणणाऱ्या व्यक्तीचा धुवटपणा दाखवित होतो."

"तो तुम्हीं दाखवायला नको. माझं पूर्वपुण्य तुमच्या हातांत हात दिला तेव्हांच मी पुरून टाकलं."

"महानंदेची भक्तीहि अशीच होती."

"तिचं उदाहरण देऊन मला धंदेवाईक गणिका ठरवितांना तुम्हांला लाज वाटली नाहीं."

"चीड. आणखी चीड. बरं वाटतं. माझ्या जखमेवर फुंकर घातल्यासारखी वाटते."

"पण तें समाधान मी तुम्हांला मिळूं देणार नाहीं."

"नाहीं. तेवढं मिळूं दे. थकलेल्या जीवाचा विरंगुळा काढून घेऊं नकोस."

"तुम्हीं थकलांत ? हं ! मी मानायला तयार नाहीं."

"खरंच थकलो आहे."

"नाहीं. तुम्हीं थकलां नाहींत. तुम्हांला झीट आली आहे. पंधरा वर्षांपूर्वीचे शाप तुम्हांला शोधताहेत. पण मी तुम्हाला शोधले जाऊं देणार नाहीं. मला तुमच्याशी कर्तव्य आहे. त्यासाठींच मी तुम्हांला पंधरा वर्षें जपलं आहे."

"जपलं नाहीं. पिळलं आहेस. चोथा करून अडगळ म्हणून माळावर जपून ठेवायला."

"नाहीं. तुम्हांला मी पुजलं. तुमच्यावर प्रेम केलं. माझ्या आयुष्याला अर्थ दिला म्हणून तुमची भक्ती केली."

"हं ! स्वार्थासाठीं केलेल्या धडपडीला एवढीं पवित्र नांवं देऊं नकोस."

"माझा स्वार्थ नाकारण्याइतका नादानपणा माझ्यांत नाहीं. असल्या भेकडपणाची मला कधीं आवश्यकता वाटली नाहीं. स्वार्थ केला मी, पण प्रामाणिकपणानं केला."

"वाघिणीची भूकहि हरिणाचा बळी घेतांना प्रामाणिकच असते."

"पुन्हां पुन्हां त्याच त्या उपमा देऊं नको."

"अधिक क्रूर प्राणी आठवत नाहींत."

"स्वतःला हरिणासारखा गरीब म्हणवून घेतांना लाज वाटायला हवी तुम्हांला. स्वतःशीं तरी प्रामाणिक असावं माणसानं."

"मला पकडींत धरून तुझ्याशीं जखडून टाकलं. हरिणासारखं नाही तर काय ?"

"हं ! बेलगाम उचलेगिरी करणाऱ्या जनावराला माणसांत आणलं असं म्हणा."

"माझ्यांतल्या पौरुषाचा जाळून पोळून मुद्दा पाडला गेला. माणूस राहिलाच कुठं ?"

"तुम्हीं काय वाटेल तें बोललांत तरी मानणार नाहीं मी."

"जाणून बुजून केलेल्या पापाची टोंचणी लागली कीं, माणूस शास्त्राधार शोधायला लागतो."

"मला टोंचणी कधींच लागली नाहीं. टोंचणी लागायला तुम्हीं कुणीं 'गरीब बिचारे' नव्हतां."

"आज मात्र झालो आहे तसा."

"हा तुमचा भेकडपणा आहे. इतक्या लवकर खचाल अशी अपेक्षा नव्हती माझी."

"अपेक्षा माझीहि नव्हती. पण खोड्यांत घातल्यावर माजलेला बैलहि लवकर खचतो ना."

"ह्याला तुम्हीं खोडा म्हणता ? पण तुमची अधिक शापांपासून मुक्तता केली म्हणून आभारहि मानून घ्या माझे."

"आभार ! हें सारं लवकर संपविलंस तरी खरोखरीच आभारी होईल तुझा."

"पण मी संपूं देणार नाहीं. माझं जीवन इतक्या लवकर धुळीस मिळावं अशी इच्छा नाहीं माझी. तेवढी नादान झालें नाहीं मी. शेवटपर्यंत झगडेन."

"त्याची जाणीव आहे मला. म्हणूनच मृत्यूची अपेक्षा."

"नाहीं, असं म्हणूं नका."

"घाबरलीस !"

"नाहीं. घाबरले नाहीं. पण अशी वेडीविद्री सांवली माझ्यावर टाकण्याचा तुमचा प्रयत्न आवडला नाहीं."

"हीहि तुझ्या खेळाचीच एक तऱ्हा ना ?"

"नाहीं. ही प्रामाणिक अपेक्षा."

"आपल्या भावाला सोबत धरून मला गुंतवलंस तूं, त्यावेळींहि हीच अपेक्षा होती ना ?"










"हो हीच होती. आणि तिच्यावरची निष्ठा आयुष्यांतली पंधरा वर्षं वेचून मी व्यक्त केली आहे. तुमच्याशीं एकनिष्ठ राहण्यासाठीं दिलेलं मोल मी एवढ्या सहजासहजी अव्हेरूं देणार नाहीं मी तुम्हांला."

"हा अहंकार कीं आत्मश्लाघा ?"

"दोन्हींहि नाहीं. तुमच्या अहंकारापुढं मी कधींच नमले होते. स्त्रीच्या अहंकाराची किंमत तरी कोणती ?"

"माझा अहंकार ? हं ! पंधरा वर्षां-पूर्वींच धुळीस मिळाला तो. ज्या अहंकारी बेदरकारपणानं स्त्रियांच्या बाबतींत जीवन जगलों त्याला एका स्त्रीनंच तुझं रूप घेऊन कायमचं गाडून टाकलं—भुतासारखं."

"मग उपकार मानायला हवेत तुम्हीं माझे."

"होय. गेलीं पंधरा वर्षं माझ्या नांवाचं कुंकूं लावूं दिलं कीं तुला !"

"नका हो ! असं नका बोलूं !"

"कां ?"

"माझं मन समजून घ्या."

"तुझं मन ? हं ! खदखदून हंसावंसं वाटतं. ह्या शब्दाला. चांगल्या शब्दांची झालर लावली म्हणून सडकी गोधडी सुगंध उधळीत नाहीं !"

"निरर्थक शब्द पेरूं नका. खरंच सांगते हो. लग्नाचं वचन देऊनच ......"

"साऱ्यांनीं तुझ्या शरीराचा उपभोग घेतला; असंच ना ?"

"किती क्रूर बोलवतं तुम्हांला !"

"माझ्या छळापेक्षां क्रूर ? हं! मग काय गोंडस शब्द वापरूं?"

"नको ! साराच मूर्खपणा ठरला. स्वारी अयशस्वी झाली म्हणजे बंडखोर म्हणून गोळी घालणं ही जगाची तऱ्हा."

"गोळी घालायची होती मी स्वतःला."

"हा भेकडपणा. मला गोळी घालायला हवी होती असं म्हणालां असतां तर समजूं शकले असते मी."

"त्यावेळीं वाटलंहि तसं. पण कोस-ळलेला इमला उभारण्याची जिद्द होती. त्या जिद्दीनं छेद दिला."

"आणि आतां एवढ्या उशीरां नको तेव्हां ढासळलांत !"

"टिकूं शकलो नाहीं. शक्तीच अपुरी पडली आहे."

"पंढासारखं बोलूं नका. स्त्री असूनहि काळीज कापून टाकणारे घाव मी सहन केले. राखेच्या कणांकणांना जोडून हा पंधरा वर्षांचा इमला उभा केला."

"आणि त्यांत माझ्या भुताला सांखळीनं बांधून ठेवलं; असंच ना ?"

"नाहीं हो ! तुमच्यावर अगदीं एकनिष्ठ प्रेम केलं मी. असल्या भयंकर कल्पना कधीं शिवल्याहि नाहींत."

"हं ! आणि त्याच जाणीवेचा तापलेला लालभडक सांडस मला सतत करपून टाकीत आलेला आहे; करपत आहे."

"आजपर्यंत कधींच ही वेदना तुम्हीं दिसूं दिली नाहींत."

"अर्थ शोधीत होती ती. आणि माझी चिकाटी सुटली नव्हती."

"मला विश्वासांत घेतलं नाहींत कधीं. मी सोबतीला असते तर कदाचित् लवकर सांपडला असता."

"माझ्या कांचेच्या घराची मला जाणीव होती; तुझ्या हातीं आपणहून धोंडा द्यायचा नव्हता मला."

"आणि आतां काय केलंत ? माझ्या एवढ्या शोधून टाकणाऱ्या दीर्घ तपश्चर्येनं उभारलेल्या माझ्या आश्रमांत अमंगल आणून टाकलंत ना ?"

"तपश्चर्या ! आश्रम !! मंगल !!! काय शब्दांचे बुडबुडे पण !"

"नाहीं. ते बुडबुडे नाहींत. मी अंतःकर-णांत जपून ठेवलेल्या प्रतिमा आहेत त्या."

"नीच ! स्वार्थी. तुझ्यासारखीनं ह्या मंगल प्रतिमा जपून ठेवण्याचं धाष्टर्य करावं ? काय अधिकार तुला ?"

"हो आहे. तुमच्यापेक्षां निश्चितच."

"नाहीं. लग्नापूर्वी पोरींना नाचवितांना सुद्धां माझ्या भावी पत्नी बाबतच्या ह्या-पेक्षांहि महन्मंगल प्रतिमा मीं उराशीं बाळगल्या होत्या. चेष्टेंत सुद्धां त्यांचा अधिक्षेप कधीं सहन केला नाहीं."

"खरं बोलतां ?"

"होय खरं ! म्हणूनच गेलीं पंधरा वर्षें सतत जळतों आहे; करपतो आहे."

"केवढा उपरोध ! स्त्रियांना फितवून त्यांना विटाळून टाकणाऱ्या राक्षसाच्या अंतःकरणांत हें मांगल्य ?"

"कां ? तूंच तेवढा प्रामाणिक स्वार्थ ठेवूं शकतेस ?"

"तसं वाटलं होतं मला."

"नाहीं. स्वर्थालाच प्रामाणिकपणा म्हणायचं असेल तर तुझ्यापेक्षां केव्हांहि अधिक प्रामाणिक ठरेन मी !"

( पृष्ठ २५ वर पहा )



अहो, जायच्या आधी माझा जरा हा चेक वटवता ना ? प्लीज !!!



# स्मृति तयांची उजळुनि टाकी अवघें जीवन........ !

—डॉ. सरोजिनी बाबर

**माणसाच्या** जीवनांत असा एक क्षण येऊन जातो की, त्याला आपल्या आत्मस्वरूपाची ओळख करून घ्यावीशी वाटते. आजचे जग कुठें चालले आहे आणि आपण या जगात नेमके कुठे आहोंत हे तपासून घेण्यास तो फार उत्सुक असतो. अशा वेळी जीवनासंबंधीचे कांहीं आडाखे त्याला साधावयाचे असतात. त्यामधून काही विशिष्ट निष्कर्ष त्याला काढावयाचे असतात. निदान मला तरी अशी प्रेरणा परवां झाली खरी. स्त्रियांनीं खूप शिकावे आणि जीवनाच्या प्रत्येक कार्यक्षेत्रात आपले वैशिष्ट्य प्रस्थापित करावे या माझ्या कल्पनेचा आविष्कार करीत असताना या संदर्भात अनेक विचार येऊन गेले.

स्त्रियांनी शिकावयाचे म्हणजे नेमके काय करावयाचे ही या विचारांची मूळ बैठक होती. पाठ्यपुस्तकातील अक्षरओळख होऊन केवळ लिहायला वाचायला येते याला शिक्षण म्हणावयाचे कीं, एखाद्या विद्यापीठाच्या सर्वोच्च परीक्षेत उत्तीर्ण झाले म्हणजे ती स्त्री शिकली असे समजावयाचे हाही एक प्रश्न आहे. माझ्या मतें ह्या प्रश्नाचे उत्तर इथे स्त्री शिक्षित होते, ती सुशिक्षित होतेच असे मात्र नाही असे येईल. कारण मन सुसंस्कृत होण्यासाठीं आणि मनाची सुदृढता वाढण्यासाठीं शालेय वा महाविद्यालयीन शिक्षणापेक्षा आणखी काही वेगळे म्हणून अत्यावश्यक असते. ते असे की, त्या ज्ञानाच्या ग्रहणामुळे मन मोठे व्हावे, विकासशील ठरावे. माणुसकी तिथे नांदावी न् अहंकाराला जागा गवसू नये. निरपेक्ष सेवाभाव तिथे रुजावा आणि स्वतः म्हणून सद्विचार करण्याची शक्ति तिथें यावी.

असले काही मनात आले म्हणजे महर्षी याज्ञवल्क्यांची पत्नी ब्रह्मवादिनी मैत्रेयी हिची आठवण येते. आपल्या प्रखर बुद्धिमत्तेच्या बळावर तिने आत्मज्ञान आत्मसात् केलेले होते. नाशिवंत अगर चंचल भासणारी संपत्ति तिला नको होती. तिने आपल्या पतीकडून मागणी केली होती ती शाश्वत पण अखंड सौभाग्यच्या संपत्तीची! कोणत्याहि गोष्टीची आसक्ती तिने मनात बाळगली नव्हती. उलट दुःख, सुख, अज्ञान आणि अहंकार हे रोग नाहीसे होतील अशा ज्ञानवल्लीचा ध्यास तिला लागला होता. स्वतःची मानसिक उंची वाढविण्याची ओढ तिच्या मनाला लागली होती. आणि तिच्या या सद्विचारांनी याज्ञवल्क्यांना परमसुख प्राप्त झाले होते.

आजच्या काळातही हे दृश्य दिसावयाला हवे आहे असा मोह माझ्या मनाला होतो. आणि मग अशी स्त्री सांपडते का पहावे या नादात मी गुंतून जाते. कर्तव्यदक्ष, प्रेमळ परंतु प्रयत्नवादी गृहिणीकडे मन ओढ घेते. खोळंबुंथी श्रमल्या जाणाऱ्या कल्पनेला ताण पडला तरी मग कशाचेच सोईरसुतक वाटत नाही.

मानवी जन्माला आल्यासारखे काही तरी जगाच्या हिताचे असे आपल्या हातून घडावें, जगाबरोबर आपलाही विकास घडवून आणावा, श्रेष्ठी प्रतीच्या माणसाप्रमाणे जगता यावे आणि आपल्या कृतीने आपण अमर व्हावे या कल्पना स्त्रीमनात आल्या पाहिजेत अशी श्रद्धा माझ्या मनात अशावेळी पिंगा घालू लागते. राजा गोपिचंदाच्या आईप्रमाणे—मैनावतीप्रमाणे—अशा विचारांनी भारलेले सुपुत्र देशाला लाभावेत हा त्या भावनेमागचा हेतु असतो. जनलोकांच्या कल्याणासाठीं या विचारांची अंमलबजावणी करणारी मंडळी या भूतलावर अवतरली पाहिजेत या ईर्षेने मन त्या शोधात धडपडू लागते. आणि मग आपले नित्याचे कर्तव्यकर्म करून व मोहाचा त्याग करून नराचे नारायण कसे होता येते याचे कौसल्येने दशरथाला केलेले मार्गदर्शन आठवूं लागते. अशावेळी राजसिंहासनावर बसूनही मोह, क्रोध, लोभ, काम, मद, मत्सर आदींचा त्याग कसा करता येतो ते शिकायचा मोह होतो.

सभा संमेलनातून भाषणे करावीत, वादविवाद जिंकावेत, उत्तम विचारांची मांडणी करावी आणि जनलोकांच्यामध्यें नांव मिळवावे ही ईर्षा आजकालच्या अनेक स्त्रियांच्यामध्यें दिसून येते. ही वस्तुस्थिति स्वागतार्ह आहे. ह्या कल्पनेचे पोषण होणेंही अत्यावश्यक आहे. परंतु अशावेळी मंडनमिश्राची पत्नी सरस्वति हिने वादविवाद सभेच्या न्यायाधीशाचे काम करून आपल्या बुद्धिमत्तेचा दिलेला कौल आमच्या अशा स्त्रियांनी नजरेपुढे ठेवल्यास फार चांगले होईल असे खास करून वाटू लागते. तसेच तिनें शंकराचार्याला वादविवादामध्ये पत्करायला लावलेला पराभवही या संदर्भात विसरता येत नाही. म्हणून मनात येते की, आजच्या स्त्रीने असे काहीतरी वैशिष्ट्यपूर्ण जीवन जगावे की, ज्यामुळें स्त्रीजीवनाबद्दल व तिच्या सुसंस्कृतीबद्दल सर्वत्र वाहवा होईल. अर्थात् प्रत्येकीला ब्रह्मवादिनी गार्गीप्रमाणे वादविवादकुशल होतां येणार नाही. तथापि तिचा आदर्श पुढे ठेवून ज्ञानार्जन मात्र खासच करता येईल असे वाटते.

आजचे युग हे जसे विज्ञानाचे युग आहे तसेच ते सामान्यातील असामान्य

शोधून त्याचा जनहितासाठीं उपयोग योग करून घेण्याचेहे युग आहे. त्यामुळें पंचायती, जिल्हा परिषदा, स्थानिक स्वराज्य संस्था, विधानसभा, लोकसभा, इत्यादी ठिकाणी आमच्या स्त्रियांनी निवडून लोककल्याणाची कामे केली पाहिजेत असा एक विचारप्रवाह सध्याच्या काळात जोराने पुढे येत आहे. अशावेळी हे काम नव्याने मूळ धरते आहे, अशी समजूत अंगी बाळगून पुष्कळजणी ईर्षेने या कामी पुढाकार घेत आहेत. परंतु वस्तुस्थिति मात्र अशी आहे की, चालुक्याच्या काळामध्यें या गोष्टी केव्हाच घडून गेलेल्या आहेत. प्रांताच्या राज्यपालांचे जागी आणि वेगवेगळ्या विभागांच्या शासनाधिकाऱ्यांच्या जागी स्त्रियांच्या त्यावेळी नेमणुका होत असत. एवढेच नाहीतर त्यांनी हे काम उत्तम प्रकारें पार पाडल्याचाहि इतिहास पहायला मिळतो.

आपल्या जबाबदारीवर एखाद्या राज्याचा कारभार पाहाणें ही गोष्ट त्यामुळेच आजच्या स्त्रीला नवीन नाही. इतिहासकालीन स्त्रियांनी या संदर्भात उज्वल कामगिरी बजावलेली आहे. त्यावेळच्या भारतीय जीवनाला रंग भरलेला आहे.

मध्य भारतातील इन्दूरच्या गादीवर देवी अहिल्याबाई होळकर आली न् तिने आपल्या स्त्रीत्वाचा जणु साक्षात्कारच जगाला घडविला! वास्तविक पतिनिधनानंतर मन खचून गेलेली ही स्त्री सती जावयास निघालेली. परंतु सासऱ्याच्या इच्छेखातर तिने राज्याची सूत्रे हाती घेतली. आणि पेशवे चाल करून येत आहेत म्हटल्यावर 'इथेहि कोणी बांगडया लेवून बसलेले नाही' असे रोख उत्तर दिले! .... "मीही सुभेदाराची सून आहे" हा तिचा आत्मविश्वास होळकर दरबारच्या बातमीपत्रात प्रकाशित झालेला पहावयास मिळतो!

झांशीच्या राणीनें रणसंग्रामावर शौर्य गाजविले आणि जिजाबाईनें राजा शिवछत्रपती महाराष्ट्राला देऊन मूर्तिमंत शौर्य इथें साक्षात उभे केले. असा इतिहास आहे. या स्त्रिया स्वतः शत्रूशी हत्यारानिशी लढल्या. अपार देशप्रेमाने त्या ओथंबून गेलेल्या होत्या. आम्ही हा वारसा जतन केला पाहिजे. जिवापाड सांभाळून त्याला नवे तेज प्राप्त करून दिले पाहिजे.

विजयनगरचे साम्राज्य लयाला गेले तेव्हाची गोष्ट. चित्रदुर्ग संस्थानच काय ते त्यावेळी सुरळीत चाललेले. पण म्हैसूरच्या हैदरची स्वारी चित्रदुर्गाच्या अभेद्य गडावर झाली. लहानसहान चोरवाटांनी हेरगिरीला ऊत आला. अशावेळी एका सरदाराची पत्नी ओबी अलौकिक शौर्य गाजवून धा तीर्थी पडली. नवरा जेवायला बसला आहे म्हणताना तिने चोरवाटेने येणाऱ्या शत्रूची निदान तरी अडीचशे डोकी मुसळाने ठेचून काढली ! ....प्रसंगावधान राखले. त्यामुळे पुरुषांना वीरश्री चढली. राष्ट्रप्रेम शिगेला पोचायला मदत झाली....

आजकालच्या स्त्रियांनी अशा राष्ट्रप्रीतीचे मानकरी व्हावे असे राहून राहून वाटते. तोच एक विचार प्रकर्षाने मनात घोळतो.

या वर्षीचा १५ ऑगस्ट राष्ट्राला उज्ज्वल दिवस घेऊन येवो ही प्रार्थना मनोमनी करीत असता ही स्मृतिचित्रे मनात घोळतात. आणि वाटते की, हे भगवती उषे हा वारसा सौभाग्याने पाळण्याची शक्ति आमच्या ठायी येईल असे काही मानचिन्ह घेऊन ये. आम्हाला मानाने जगता येईल अशी स्फूर्ति देत तूं डामडौलाने ये. तुझ्या पुढे आम्ही हळदकुंकवाच्या पायघड्या घातल्या आहेत. आणि नेत्रांची पंचारती पाजळली आहे. आमच्या ठायीचा खोटा अहंभाव नाहीसा करून आमच्याकडे विलासवृत्तीने धाव घेणाऱ्या नखऱ्याची नामशेष करून आम्हाला शरीरानं व मनानं बलवान करण्याचे वाण घेऊन ये.

---

( पृष्ठ २३ वरून )

"म्हणजे? गेल्या पंधरा वर्षांत सारा खेळ खेळलांत ?"

"होय खेळ ! ज्या दिवशीं तूं मला फसवून जाळचांत ओढलंस आणि तुझ्या भावानं कट रचून पकडून तुला माझ्या गळचांत बांधलं त्या दिवसापासून तुझा मी तिरस्कार करतो...फक्त तिरस्कार— सडलेल्या महारोग्यापेक्षांहि जास्त किळस असलेला तिरस्कार..."

"स्स ! आई ग ! आणि गेलीं पंधरा वर्षं तुम्हीं मला पत्नीप्रमाणं वागवलंत, प्रेम दाखवलंत, जुनं सारं विस्मृतींत दडवून नव्या पानावर नवीन भरतवाक्य लिहून... हें—हें सारं नाटक ?"

"नाहीं..तें नाटक नव्हतं. मी तुझ्यावर कधींच प्रेम केलं नाहीं. तुझ्या देहाचा उपभोग तेवढा घेतला. आणि त्यांत नाटक नव्हतं. तृप्तीचा विश्वास टाकला पण तो नाटकी नव्हता. हॉटेलांतला ग्लास उष्टा आहे हें माहित असूनहि त्यानं पाणी प्याल्यावर प्रामाणिक समाधान वाटतंच कीं ! तसा !"

"देवा रे ! हा सारा सारा एवढा भयंकर खेळ होता ?"

"तुझा विचार करण्याचा प्रश्नच नव्हता. कधीं विचारच केला नाहीं. मी प्रेम केलं तें तुझ्या ठायीं आक्षेपित केलेल्या माझ्या अंतःकरणांतील अशरीरिणी पत्नीवर. तिच्या पवित्र निर्मल निराकार आत्म्यावर. तूं माध्यम होतीस. त्या आत्म्याचं झाड केवळ होतीस."

"आई ग !"

"रडूं नकोस. ह्याच एका स्वप्नमय जाणीवेवर गेलीं पंधरा वर्षं जगलो. आज माझ्या मनांतली ती प्रतिमा, तो आत्मा, मला सोडूं पाहत आहे. आयुष्याची संध्याकाळ झपाट्यानं छाया फेकीत पुढं येते आहे. अशक्य होत आहे. ती सोडून जात आहे. माझं मन पूर्वीइतकं सकस राह्यलं नाहीं. मीच निर्माण केलेली प्रतिमा मला पेलणं अशक्य होत आहे. ती सोडून जात आहे. आज मी एकटा पडतो आहे, आणि खचतो आहे, ढांसळतो आहे."

"पण मी ग्वाही देते. मी प्रेम केलं तें तुमच्यावर. केवळ तुमच्यावर. माझ्या प्रेमांत कसलीच प्रतारणा मी ठेवली नाहीं. मला कांहींही समजा. तुमच्या अशरीरिणी पत्नीचं माध्यम समजा किंवा एक जीव नसलेला देह समजा. पण मला तोडूं नका. मला तुमच्यापासून दूर जायचं नाहीं. ह्या वयांत तरी नाहीं. मला अहंकार राहिला नाहीं. एका पतित स्त्रीला कोणता अहंकार ठेवणं शक्य आहे ? नाहीं.....नाहीं....अशानं खचून जाईन हो मी...."

एक दीर्घ निर्जीव शांतता—

"झालं. सारं पिळून झालं. पंधरा वर्षांच्या वंचनेची जखम आज हलकी पडली."

"तुमची जखम हलकी पडली. पण ती जखम आतां तुम्ही मला दिलीत. घासघासून मरण्याचं एक साधन माझ्या गळचांत बांधलंत. माझ्या आयुष्यांतील अर्थच काढून टाकलांत."

"हं ! नाहीं. आता तो आला. माझी अशरीरिणी पत्नी—जिनं गेलीं पंधरा वर्षे नष्ठेनं माझी साथ केली—ती आज संध्याकाळीं मला सोडून जाते आहे. माझं मनस्वी रूप संपतं आहे. शारीर तेवढं राहिलं आहे. मन दुर्बल झालं आहे. आज खरी आवश्यकता आहे मला तुझ्या प्रेमाची. निराधार होत आहे ग मी आज. आता तूंच आधार दे. मला आपल्या कुशींत घे. तेवढीच इच्छा ! बस्स ! पंधराव्या वाढदिवशींची एवढीच भीक मागतो तुला...."

दोन हुंदके आणि सजीव शांतता !





अनुक्रमणिका



भारताचा थोर देशभक्त

# नाना शंकरशेट

जुलै महिन्याचे अखेरीस भारताचे थोर सुपुत्र व समाजसेवक नाना शंकरशेट यांची मृत्युशताब्दि देशभर साजरी केली जाणार आहे. पुढील वर्षभर ह्या महापुरुषाचा यशोदुंदुभी गरजत राहील.

—सदानंद चेंदवणकर

कै. नाना शंकरशेट यांचे नांव आजच्या सुशिक्षित पिढीच्याहि स्मरणांत आहे याचे मुख्य कारण मुंबई विद्यापीठाच्या मॅट्रिक्युलेशन व आताच्या एस्. एस्. सी. बोर्डाच्या परीक्षेत संस्कृत विषयांत पहिला व दुसरा क्रमांक मिळविणाऱ्या उमेदवारांना त्यांनीं ठेविलेल्या शिष्यवृत्त्यांची योजना हेंच होय. परंतु नानांनीं आपल्याला लाभलेल्या ६२ वर्षांच्या आयुष्यामध्यें जीं अनेक सत्कृत्यें व सामाजिक हिताच्या गोष्टी केल्या त्यामध्यें ही शिष्यावृत्त्यांची बाब अगदींच गौण समजावी लागेल. पण कुणाचें नांव कोणत्या कारणानें अजरामर होईल हे सांगणें कठीण आहे. योगायोगाचाच भाग त्यांत प्रमुख असतो. मुंबापुरीच्या जीवनांत नानांनीं ज्या अनेक सार्वजनिक कार्यांचे उपक्रम केले त्यावरून नानांना "मुंबईच्या सार्वजनिक जीवनाचे जनक" असें जर म्हटलें तर तें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. नानांनीं स्थापिलेल्या व वाढविलेल्या संस्थांची जंत्री जरी नुसती वाचली तरी छाती दडपून जाते. शिक्षण कार्यापासून तो थेट हिंदूंच्या अत्यंविधीच्या कायम व्यवस्थेपर्यंत नाना शंकरशेट यांनीं जी सार्वजनिक संस्थांची बांधणी केली त्यांत त्यांच्या बुद्धीची व दूरदृष्टीची झेंप सहजच नजरेस पडते.

कै. नाना उर्फ जगन्नाथ शंकरशेट यांच्या जन्ममृत्यूच्या तारखा जरी नुसत्या लक्षांत घेतल्या तरी त्यांची कारकीर्द कोणत्या कालखंडाला व्यापून राहिली व त्याच्यावर त्यांनीं आपल्या कर्तबगारीचा ठसा कसा उमटविला याचा बोध होतो. सन १८०३ म्हणजे पेशवाईची अखेर होण्यापूर्वी पंधरा वर्षे ते जन्मले व १८६५ सालीं म्हणजे हिंदी राष्ट्रीय सभेची स्थापना होण्यापूर्वी वीस वर्षे त्यांचे देहावसान झाले. गोऱ्या सरकारचें वर्चस्व पूर्णपणें या देशांत विशेषतः पश्चिम हिंदुस्थानांत प्रस्थापित होण्याचा हा काल होता. या कालांत स्वाभाविकपणेंच राज्यकर्ते व प्रजाजन या उभयतांचेहि प्रतिनिधित्व किंवा वकिली करणारे जे लोकाग्रणी होऊन गेले त्यांत बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग, लोकहितवादी उर्फ गोपाळराव देशमुख, रावसाहेब रानडे, काशीनाथपंत तेलंग, दादाभाई नवरोजी, रावसाहेब मंडलिक, जमशेटजी जीजीभाई, फेरोजशाहा मेहता वगैरेंची गणना करावी लागेल. या सर्व अग्रणींशीं सहवास घडलेले व या सर्वांशीं लोककल्याणासाठीं व परोपकार बुद्धीनें सहकार्य केलेले असे जगन्नाथ शंकरशेट हे एक थोर पुरुष होऊन गेले. मुंबई इलाख्याचा पहिला राज्यपाल माऊंट स्टुअर्ट एलफिन्स्टन् याचे व त्यानंतर पांच पांच वर्षांनीं येणाऱ्या राज्यपालांचे ते समकालीन होते. त्यांचा अंत झाला तेव्हां सर बार्टल फिअर हे मुंबापुरीचे राज्यपाल होते.

नाना शंकरशेटजी ऐन उमेदींत येईतोंपर्यंत रेल्वेमार्ग, पोस्ट व तारायंत्र, छापखाने वगैरे सुधारणा झालेल्या नव्हत्या. त्यांच्याबद्दल वाटाघाटी मात्र चालू होत्या. ता. १६ एप्रिल १८५३ रोजीं मुंबईपासून ठाण्यापर्यंत प्रथम आगगाडी सुरू झाली. या आगगाडीच्या कंपनीची कचेरी अगदीं प्रथम नानांच्या ठाकुरद्वारवरील वाड्यांत १८५० सालीं होती. या गाडीच्या अगदीं पहिल्याच मुंबई पासून ठाणें येथें झालेल्या व परतीच्या प्रवासांत नियंत्रित केलेल्या प्रवाशांत नाना हे प्रमुख होते. अठरा डब्यांची व तीन एंजिनाची ही गाडी बोरीबंदरवरून ठाण्यास पोचण्यास ५७ मिनिटें लागली. या कंपनीच्या पहिल्या डायरेक्टरांत नाना होते. भारत व इंग्लंड यांच्या दरम्यान वाफेनें चालणाऱ्या आगबोटी पी. अँन्ड ओ. कंपनीनें सुरू केल्या. याबद्दलची खटपट २५ वर्षे चालू होती. या कामांत देखील नानांचा पुढाकार होता. ही पार्श्वभूमी सांगितली म्हणजे नाना शंकरशेट कोणत्या काळांत वावरत होते याची कांहींशीं कल्पना येईल.

याशिवाय "बॉम्बे असोसिएशन" या नांवाची राजकीय स्वरुपाचे काम चालविण्याकरितां एक संस्था काढण्यांत नानांचाच प्रमुखपणा होता. रावसाहेब मंडलीक, जमशेटजी जीजीभाई, डॉ. भाऊ दाजी लाड हे त्यांचे सहकारी होते. इंग्रज व हिंदी प्रजाजन हे एकाच राणीच्या अंमलाखालीं असल्यानें त्यांच्यात कोणत्याहि प्रकारचा भेदभाव किंवा पंक्तिप्रपंच असतां कामा नये असे नानांच्या पहिल्या राजकीय मागणीचे स्वरूप होते. या संस्थेचे जमशेटजी जीजीभाई हे अध्यक्ष व नानांचे थोरले चिरंजीव विनायकराव हे चिटणीस असा संच

(पृष्ठ ६० वर पहा)

अनुक्रमणिका











ताजमहाल म्हणजे
तृप्त प्रीतीनें पाहिलेलें
रमणीय, संगमरवरी स्वप्न ! त्याची
स्वप्नें नीतानें लहानपणापासून
पाहिलीं. ताजमहाल
तिनें पाहिलाही.
पण केव्हां ?....

--लीला श्रीवास्तव

**ती** एक अशीच संध्याकाळ होती. श्यामल वर्णाची कोमल संध्याकाळ. जुलै महिन्यांतली भुरुभुरुं पावसांत भिजणारी संध्याकाळ बारीक छिद्राच्या चांदीच्या गुलाबदाणींतून सुगंधित पाणी शिंपडावं तसा पाऊस मध्येंच शिडकाव करून जात होता. शिडकाव संपल्यावर ढगांच्या फटीतून एखादा चुकार सोनेरी किरण खटयाळपणं हळूंच डोकावून जात होता. अन् मग प्रशस्त हिरवळीवर, माडाच्या उंच उंच झाडावर अन् संगमरवराच्या त्या सुंदर शिल्पावर सोन्याचा वर्ख डकविला जात होता.

सृष्टीसौंदर्याच्या ओझरत्या दर्शनानंहि वेडया होणाऱ्या नीताचं तिकडं लक्षच नव्हतं आज. ताजमहाल पाहण्याची किती उत्कट इच्छा होती नीताला. त्याचं ते अमर सौंदर्य पहायला ती किती वर्षांपासून आसुसली होती ! आज तो योग आला होता. आज संगमरवरांतलं ते शुभ्र स्वप्न तिच्या डोळयांपुढं साकार उभं होतं, नाजुक जाळीदार नक्षी, कमालीची सजीव वेलबुट्टी स्वप्न पहात असल्याच्या अवस्थेंत उभे असलेले ते चार मिनार आणि समोरच्या आरशासारख्या स्वच्छ पाण्यांत पडलेलं ताजचं ते मुग्ध, वेड लावणारं प्रतिबिंब ! सारं सारं आज नीतासमोर प्रत्यक्ष उभं होतं पण ते पाहून नीता तृप्तीनं चिवचिवली नाहीं. ते डोळ्यानं किती पिऊं अन् किती नाहीं असं तिला झालं नाहीं. त्या साऱ्या अप्रतिम सौंदर्याकिडं ती काय रिक्त नजरेनें पहात राहिली...

"पुष्कळांची ताज पाहून निराशा होते. ज्या अवर्णनीय सौंदर्याची त्यांनीं कल्पना केली असते त्यापेक्षां वास्तव थिटं पडतं. तुम्हांलाहि असंच कांहीं वाटतं आहे का नीताजी ? नीताजी ! विभक्त व्हायचं ठरविल्यापासून विजयनं तिला 'नीता' अशी लाडिक हांक मारणं सोडलं होतं. तो आतां नीताजी हे बहुमानदर्शक संबोधन वापरूं लागला होता. 'या' 'जा' म्हणूं लागला होता.

पावसाच्या अतिशय बारीक तुषारांच्या थंड स्पर्शानं नीताच्या अंगांत एक फुरफुरी

अनुक्रमणिका







धांवून गेली. हिरव्या बंगलोरी साडीचा पदर डोक्यावर घेत तिनं पाण्यांतल्या त्या निश्चल प्रतिबिंबाकडं पाहिलं . . .

तिला वाटलं . . . आज ताजमहाल पहायला नको होता. या व्यथेच्या ओझ्या-खालीं ताजमहालाचं सारं सौंदर्य चिरडलं जात आहे.

विजयला तिनं कांहींच उत्तर दिलं नाहीं.

विजयला तिचं हे मौन असह्य झालं. तो थोडासा चिडून म्हणाला, "नीताजी, तुम्हीं कराराच्या विरुद्ध वागत अहांत हां—आजची ही शेवटची संध्याकाळ दोन मित्रांच्या मोकळेपणांत घालवायची ठरवली होती ना आपण ?"

करार ! दोन मित्रांचा मोकळेपणा ! नीता मनांत म्हणाली. विजय, तुझ्याकरतां किती सहज आहे हे सारं, पण मी ! माझ्या मनांतल्या त्या छिन्नभिन्न प्रेमाचं मी काय करूं ?

एवढ्यांत एका मोठ्याश्या सांवळ्या ढगानं आकाश व्यापलं गेलं अन् वाता-वरणाचा रंग आणखी राखाडी झाला.

खरं म्हणजे नीताची फार फार इच्छा होती ताजमहाल पहायची. लग्नानंतरच्या नवलाईच्या काळांतले निदान कांहीं दिवस ताजमहालाच्या या काव्यमय परि-सरांत काढावेत असं फार वाटत होतं तिला. पण तेव्हां तें शक्य झालं नाहीं. शक्य झालं ते आतां, आज ! वैवाहिक जीवनाचा आजचा शेवटचा दिवस हंसून खेळून घालवावा असा विजयचा हट्ट होता. "नीताजी, तुम्हाला ताजमहाल पहा-यची फार इच्छा आहे ना ? चला आपण पंधरा तारखेला दिल्लीला जाऊंया—मग सोळाला आग्रा. सोळाची संध्याकाळ ताजच्या कुशींत लोळून घालवायची. अन् मग सतराला ठरल्याप्रमाणं आपण आप-आपल्या गांवीं जायचं."

किती अलिप्तपणं, किती निर्विकारपणें विजय हे सारं बोलून गेला होता. वर्षा-पूर्वी तो आपल्या पॉकेटमनीचा हिशोब तिला जेवढ्या सहजपणं देत असे तेव्हढ्याच सहजपणें !

नीतानं प्रतिकार केला नाहीं. प्रतिकार करायची तिच्यांत शक्तीच उरली नव्हती. विजयनं ज्या दिवशीं तिला स्पष्टपणं सांगि-तलं, "नीताजी हे शिथिल, अनावश्यक बंधन आपण तोडून टाकूया. मी फार फार आभारी होईन तुमचा." त्या दिवसापासूनच कैक वर्षांपासून आजारी असलेल्या माण-साचा अशक्तपणा तिच्या गात्रांत ठाण देऊन बसला. विजयला त्याचा थोडासा आभास मिळाला तेव्हां शक्तीचं टॉनिक पाजण्याच्या दयेनं तो म्हणाला, "नीताजी, तुम्हीं तुमच्या आवडीप्रमाणं पुन्हां लग्न करा. वाटल्यास मी मदत करीन तुम्हांला. अजून कांहींच बिघडलेलं नाहीं."

विजय म्हणाला, "नीताजी, प्रथम आपण मुमताज अन् शहाजहानच्या कबरा असलेल्या भुयारांत जाऊंया." हातांत कंदील घेऊन गाईड पुढं झाला अन् त्याच्या मागोमाग विजय व नीता भुयारांत शिरले.

अर्धवट कुंद अंधार, अन् खोल संथ पाण्यासारखी स्तब्धता असलेल्या त्या भुया-रांत प्रवेश केल्यावर कां कुणास ठाऊक नीता एक गाढ उदासीनतेंत आकंठ डुंबून गेली.

समोर शहाजहान अन् मुमताजच्या कबरी होत्या. त्यावर कांहीं ताजी फुलं होतीं व धूपदानामध्यें धूप जळत होता.

शहाजहानाच्या कबरीजवळ उभी राह-तांच एक हळुवार साद नीताच्या तोंडून निघून गेली, "वि . . ज . . य . ." तेवढाच हळुवार प्रतिध्वनी उमटला, "वि . . ज . . य . ." तिनं पुन्हां साद घातली अन् पुन्हां तो प्रतिध्वनी भुयाराच्या जाड भिंतीला टक्कर मारून परत आला. अशी साद घालतांना जवळ उभ्या असलेल्या विजयकडं तिचं अजिबात लक्ष नव्हतं. जणुं ती दुसऱ्याच विजयला साद घालीत होती. जणुं तिचा तो विजय एका अज्ञात निबिड जंगलांत केव्हांच हारवून बसला होता अन् नीता त्याला युगा युगा-पासून शोधीत होती, साद घालीत होती.



अनुक्रमणिका







मोहिनी निद्रेंत असल्यासारखी नीतानं पुन्हां अत्यंत कोमल आवाजांत साद घातली "वि..ज..य.." ध्वनी भुयारांच्या जाड भितीशी टक्कर घेऊन परत आला आणि त्यांतली कातरता त्या संथ स्तब्धतेंत मिसळून गेली तेव्हां चमकून विजयनं नीताला त्या भुयाराबाहेर ओढलं.

मुमताज, शहाजहानची प्रेमकथा गाईड अगदीं रंगात येऊन सफाईदार इंग्रजींत सांगत होता; वेलबुटचावर बोटं फिरवून त्यांतील खुब्या उलगडून दाखवित होता. पण नीताला कांहीं कळत नव्हतं, कांहीं समजत नव्हतं.

विजय निरिक्षणांत गुंतला होता तेव्हांच ती पायऱ्या उतरून खालीं आली अन् यमुनेच्या किनाऱ्यावर बांधलेल्या ताजमहालच्या मागच्या भितीशी जाऊन उभी राहिली.

वर सांवळचा ढगांचे पुंजकेच्या पुंजके बेफिकीरपणें विखुरले होते. पावसाची कुरबुर आतां पूर्ण थांबली होती. पण हवेंत एक अंग शहारून टाकणारा गारवा होता. नीतानं भितीवरून खालीं वांकून पाहिलं.

प्रियकराला भेटायला निघालेल्या प्रेयसीच्या गतीनें खाली यमुना वहात होती. अन् त्या पलिकडं हिरव्यागार नव्या तरण्या झाडांचे पुंजके, अन् त्या हिरवेपणाला स्पर्श करायला अधीरतेनें झुकलेलं आकाश !

हे सारं सुंदर आहे, युगायुगापासून उराशीं बाळगलेल्या एखाद्या अव्यक्त स्वप्नासारखं सुंदर ! उत्कट प्रेमाच्या अव्यक्त अनुभूतीसारखं सुंदर ! पण ह्या सुंदरतेंत उन्माद नाहीं उलट एक विलक्षण कातरता आहे !

या विस्तीर्ण, गर्भरेशमी निळचा सांवळचा आकाशाच्या चौकटींत एका शुभ्र स्फटिकाच्या तुकडचासारखा जडवलेला ताजमहाल ! आणि एक अव्यक्त कातरपणा वर्षानुवर्षापासून उराशीं बाळगणारा हा आसमंत, निळी मखमल सळसळावी तसं यमुनेचं हे अल्लड पाणी !

किती तरी वेळ नीता भारावल्यासारखी तशीच उभी होती. विजय केव्हां जवळ येऊन उभा राहिला हे तिला कळलंच नाहीं. तक्रारीच्या सुरांत तो म्हणाला, "नीताजी किती शोधलं मी तुम्हांला ? इथं केव्हां येऊन उभ्या राहिलांत तुम्हीं ?"

नीताच्या डोळयांतून दोन आंसव गळून भितींवरून खाली पडलीं व यमुनेच्या पाण्यांत विलीन होऊन गेली.

तिला ओरडून म्हणावसं वाटत होतं: निदान या क्षणी, या ताजमहालाच्या सहवासांत मला नीताजी म्हणूं नका, एका परकेपणाची, एका धारदार अंतराची जाणीव देऊ नका." पण मोठ्या प्रयत्नानं तिनें आपले शब्द परतविले. जो एक तासानंतर आपला कोणी नव्हे त्याच्यासमोर असा दुबळेपणा प्रगट करणं किती अनावश्यक, किती मूर्खपणाचं आहे ! एक तास..फक्त एक तास ! अन् त्यानंतर तीं दोघं वेगवेगळचा गाडींत बसलेले असणार.

गाडीतल्या प्रवाश्याप्रमाणं ती दोघं योगायोगानं एकत्र आली होती व आपापलं स्थानक आल्यावर उतरून जाणार होती. पुढील प्रवासांत विजयला नीताची सोबत नको होती. ती सोबतीच्या दृष्टीनं त्याला अनुपयुक.ा, अपुरी वाटत होती. विजयच्या म्हणण्याप्रमाणं आईबापांनी केलेली चूक दुरुस्त करायला हवी होती. आणि ती तशी दुरुस्त करायचीच असं विजयनं ठरवलं होतं. नीतानं त्याला कां म्हणून प्रतिकार करावा ? नीतानं प्रतिकार केला नाहीं. अन् आजच्या दिवसानंतर त्यांनीं विभक्त व्हायचं ठरविलं. पण नीताच्या मनांत एका ताजमहालाचा पक्का पाया घातला होता.. तिनं पुढच बांधकाम स्थगित केलं पण हा मजबूत पाया तिला उखडून फेकतां येईना... तिला आपली शक्ती फार फार अपुरी वाटूं लागली.

☆ ☆ ☆

आणि एक वर्षानंतर पुन्हां सोळा जुलै आली. नीता बेचैन होऊं लागली. अन् मग या बेचैनीतच तिनं आगऱ्याचं तिकीट काढलं अन् ती गाडीत जाऊन बसली. एका वर्षापूर्वी तिनं सोळा जुलैची संध्याकाळ ताजमहालच्या परिसरात काढली होती—तशीच हीहि संध्याकाळ काढावी म्हणून !

ज्या वेलबुट्टीवर विजयनं बोटं फिरविली त्याच वेलबुट्टीवर पुन्हां बोटं फिरवायला, ज्या लॉनवर विजय लोळला होता त्याच लॉनवर पुन्हां लोळायला ती उत्सुक होती. वर्षापूर्वी ताजमहालाच्या वातावरणांत विजयनें सोडलेला श्वास आपल्या फुफ्फुसांत ओढून घ्यायला ती उत्सुक होती.

या अवधीत विजयची दोन पत्रं आली होती. एका स्नेहयाच्या जिव्हाळयानं त्यानं तिच्या प्रकृतीची, नोकरीची चौकशी केली होती. इतर कांहीं आवश्यकता असल्यास तावडतोब लिहायला सांगितलं होतं. पत्राची नीतानं कित्येक पारायणं केली, पण त्या बांधल्या गेलेल्या पायावर एक नवी वीट ठेवण्याइतकाहि आधार तिला त्या पत्रांतून मिळाला नाहीं. तिनं उत्तर द्यायचं टाळलं. तिला भीति वाटत होती, आपण उत्तर लिहायला बसलो तर न जाणो काय लिहून टाकूं ते !

नीतानं एकाहि पत्राचं उत्तर दिलं नाहीं तेव्हां विजयनें तिसरं पत्र पाठविण्याची खटखट केली नाहीं. दोन पत्रं पाठवून त्यानं आपलं कर्तव्य पार पाडलं होतं.

आणि बरोबर एक वर्षानंतर सोळा तारखेलाच ती पुन्हा ताजमहालाच्या प्रवेशद्वारांत जाऊन उभी राहिली. तिनं तीच हिरवी बंगलोरी साडी व पांढरा चिकनचा ब्लाऊझ घातला होता.

पण आज त्या दिवशी सारखा पाऊस कुरबुरत नव्हता कीं सांवळचा ढगांनीं






अनुक्रमणिका

आकाश डंवरून गेलं नव्हतं. उलट उतरत्या दुपारची रेशमाच्या पिवळ्या लडासारखी मृदु उनं ताजच्या शुभ्र शिल्पावर झिळमिळत होती. ताजच्या समोर ओळीनं लावलेली ती ताडाच्या झाडांची रुंद पानं हळुहळू सळसळत होती अन् त्या विल्लोरी कांचासारख्या स्वच्छ पाण्यांत इवले इवले तरंग उठत होते.

त्या प्रवेशद्वारांत नीता क्षणभर थबकली. आकाशाच्या निळ्या पृष्ठभूमीवर कोरलेल्या त्या श्वेत स्वप्नाकडं तिनं तिथूनच नजर टाकली. एका वर्षापूर्वी ताजम्हालनं न कळलेलं सौंदर्य आज तरी कळतयं कां हें ती अजमावून पहात होती.

अन् मग आश्चर्याच्या प्रचंड धक्क्यानं ती संपूर्ण हादरून गेली. ताजमहालाच्या पायऱ्या चढणारा, ॲश कलरच्या सुटांतला तो तरुण विजयचं होता याची तिला शंका उरली नाहीं.

आश्चर्याचा पहिला धक्का ओसरून गेल्यावर एका सुखद शंकेनं ती व्याकुळ झाली. तो भार तिला असह्य होऊं लागला. तिचे पाय कापूं लागले. ती सुखद संभावना तिला पेलेना! माझ्यासारखाच उत्सुक होऊन तर विजय इथं आला नसेल?

तिचे पाय लटपटूं लागले आणि असेल नसेल ती शक्ति एकवटून विजयच्या बाहुपाशांत स्वतःला झोकून द्यायला ती जवळपास धांवूं लागली.

विजय एव्हांना पायऱ्या चढून वर गेला होता व खालच्या पाण्याकडे बोट दाखवून तो कांहींतरी बोलत होता.

नीता चबुतऱ्याखालींच थबकली. आणि तिच्या लक्षांत आलं कीं, विजय एकटा नाहीं. त्याच्या बरोबर एक गोरीपान लवचिक बांध्याची तरुणी आहे. तिचे मानेपर्यंत रुळणारे पिंगट आंखूड केस, बदामी स्कर्ट व निळे डोळे स्पष्ट सांगत होते कीं, ती भारतीय नाहीं.

नीताला वाटलं, ती एखादी विदेशी टुरिस्ट असावी अन् विजय तिला कांहीं समजावून सांगत असावा. तिचे पाय इतके लटपटूं लागले कीं, शेवटीं तिला चबुतऱ्याचा आधार घ्यावा लागला.

त्याच क्षणीं खाली वाकून पाहणाऱ्या विजयनं तिला पाहिलं. वरूनच तो आश्चर्यानं ओरडला; "नीताजी"!

नीताजी!

नीताच्यानं वर पाहवलं गेलं नाहीं. तिच्या शरीराचा तोल जाऊं लागला. रेशमी साडीचा सळसळणारा पदरसुद्धां तिच्यानं सांवरला जात नव्हता. स्प्रिंग लागलेलं कांहींतरी मनांत फैलत होतं अन् बंद होत होतं.

विजय धडधड पायऱ्या उतरून खालीं आला. "नीताजी! इथं?" नीतानं विजयकडं एका दीर्घ नजरेनं पाहिलं. एका वर्षांत विजय आणखी स्मार्ट दिसूं लागला होता. उन्हांत पिकलेल्या गव्हासारखा त्याचा रंग तजेलदार दिसत होता. त्याच्या डोळ्यांत एक नवीन, एक अपरिचित उल्हास होता. नीतानं हा उल्हास त्याच्या डोळ्यांत पूर्वी कधीं पाहिला नव्हता. नीतानं शेवटीं कसंबसं स्पष्टीकरण दिलं. "इथं माझ्या एका

मावस वहिणीचं लग्न होतं म्हणून...
"एवढं धडधडीत खोटं बोलायची तिला संवय नव्हती म्हणून ती मध्येंच अडखळली.

नीताला वाटलं. विजय आता विचारेल कीं, पत्राचं उत्तर कां पाठविलं नाहीं, वगैरे. पण विजयनं कांहींच विचारलं नाहीं. त्याची नजर वर लागली होती. नीतानं काय सांगितलं तें सुद्धां बहुतेक त्याला नीटसं ऐकूं आलं नाहीं.

घाईघाईनं तो म्हणाला, "नीताजी, चला ना वर." अन् तो दोन पायऱ्या चढूनसुद्धां गेला.

नीतानं आपल्या चपला, पादत्राणं सांभाळणाऱ्या पोऱ्याच्या हवाली केल्या अन् ती त्या शुभ्र गुळगुळीत पायऱ्या चढूं लागली. पायऱ्यांच्या त्या थंड, स्नेहहीन स्पर्शानं तिच्या अंगांत एक शिरशिरी निघून गेली. नीता दोन तीन पायऱ्या चढते न चढते तोच विजयनं साऱ्या पायऱ्या उड्या मारून पार केल्या. अन् तो त्या मोगऱ्याच्या फुलासारख्या वदामी स्कर्टवाल्या पोरीजवळ जाऊन उभा राहिला.

नीता जवळ आल्यावर त्यानं परिचय करून दिला. "डायना, ह्या नीताजी."

"डायनानं आपला प्राजक्ताच्या देठासारखा लालसर नाजुक हात हस्तांदोलनासाठीं पुढं केला. नीताला आपला सांवळा कठोर हात पुढं करायची लाज वाटली. तिनं हात जोडून नुसता नमस्कार केला.

आणि मग विजय व डायना ताजमहालवर इंग्रजींत चर्चा करूं लागले, ताजमहालच्या डौलदार गुम्बजावर पडलेल्या उन्हाच्या सोनेरी मुलाम्याकडे माना उंच करून पाहूं लागले, आणि भुयारांत जायचं कीं, आधी मिनारावर याची घासाघीस करूं लागले.

नीताला वाटलं, आपली उपस्थिति इथं अनावश्यक आहे. आपण उगीचच वर आलो.

"चला नीताजी, प्रथम आपण भुयारांत जाऊंया!

नीता भानावर आली व वटन दावलेल्या यंत्रासारखी चालूं लागली.

भुयारांतला तोच अर्धवट अंधार, तीच संथ खोल पाण्यासारखी स्तब्धता! वर्षापूर्वीं घातलेल्या त्या सादेचे प्रतिध्वनी नीताच्या कानांत ताजे होऊन घुमूं लागले. आरतीच्यावेळीं मंदिराच्या साऱ्या घंटा एकदम वाजूं लागाव्यात, तसे! विजय... विजय... विजय...

पण दुसऱ्याच क्षणीं एक जिवंत आवाज एखाद्या उंची अत्तरासारखा त्या नीरव स्तब्धतेंत फैलूं लागला. तो आवाज होता विजयचा. एका आकंठ तृप्तीत, एका उत्कट रंगाच्या गाढ प्रेमांत बुचकाळून काढलेला....

डायना... डायना... डायना...

त्या अत्यंत कोमल, अत्यंत स्निग्ध आवाजाचे प्रतिध्वनी साऱ्या भुयारांत खेळूं लागले.

नीताला आठवलं, विजयनं तिला कधी अशा आवाजांत हांक मारली नव्हती.

प्रत्युत्तरादाखल डायना विजयच्या अगदीं जवळ सरकली. अन् त्या धूसर प्रकाशांतहि नीताला कळलं कीं, दोघांचे हात आपोआप गुंडाळले गेले आहेत. ते अजिबात विसरले आहेत कीं, थोड्याच अंतरावर नीता उभी आहे.

नीताच्या मनांत रचल्या गेलेल्या व आजपर्यंत शाबूत असलेल्या त्या ताजमहालच्या पायांतल्या विटा धडाडून कोसळून पडण्यासाठीं बेचैन होऊं लागल्या!

●●●












**मे महिन्यांत सुरू झालेल्या या एका आगळ्या आणि अत्यद्भुत अशा प्रवासचित्रणाचा हा तिसरा रोचक विभाग........**

—दिलीप पु. चित्रे

## १४

**विजूचे** दिवस भरत होते आणि त्याच वेळीं शाळेचं वर्ष संपायला आलं होतं. असेल्लाच्या हॉस्पिटलांत पुरेशा सोयी नसल्यामुळें दरमहा आद्दिसला जावं लागायचं. पुढें तर तिच्या एकंदर प्रकृतीचा विचार करून तिला उपचारांसाठीं आणि बाळंतपणासाठीं आद्दिसलाच ठेवावं लागलं. साधारण दीड महिना अगोदरच ती आद्दिसला हॉस्पिटलांत दाखल झाली. मी वार्षिक परीक्षा आटोपण्याची वाट पहात असेल्लाला राहिलो. दर शुक्रवारीं १७६ किलो मिटरांचा प्रवास करून मी आद्दिसला जायचो. शाळेचा पांच दिवसांचा आठवडा संपवून, तुंबलेली कामं संपवून मी कधीं एकदां आद्दिसला जाईन असं मला होत असे.

आठवड्याचे हे पांच दिवस जेम तेम रेटले जात. सकाळीं आठ ते संध्याकाळीं पांच शाळेंत वेळ जायचा. नंतरचा वेळ ठाकूरच्या, मल्यच्या किंवा जॉनच्या घरीं. अधुन मधून बारमध्यें. पहिले आठदहा दिवस असे गेले, मग याचा कंटाळा यायला लागला. दोनतीन आठवडे लोटल्यावर मी एकटाच घरीं राह्यला लागलो. लिहायचं वाचायचं सोडून दिलं होतं. सिगरेटी, सिगरेटी, सिगरेटी. रेडिओवरलं संगीत. रात्रीं पेगवर पेग ब्रँडी किंवा व्हिस्की.

तासचे तास कांहीं न बोलतां नुसता पीत मी बसत असे. बोलायला कोणी नसायचेच. मोलकरणीनें सहा वाजतांच करून ठेवलेला स्वैपाक टेबलावर थंड पडलेला असायचा. पेट्रोमॅक्ससुद्धां मी लावत नसे. एका मेणबत्तीच्या प्रकाशांत रिकाम्या शेजघरांत मी सोड्याच्या दोन बाटल्या आणि ब्रँडी किंवा व्हिस्कीची बाटली समोर ठेवून ग्लासासारखा बसायचों.

नशा केव्हां आणि किती पिऊन यावी याला नियम नव्हता. पण सहसा ती लवकर येत नसे. यायची ती भगभगीत आणि उजाड. दर घोटागणिक मला जास्तच जाग यायची. मोठ्यांदा ओरडावेसे वाटायचे. भोंवतालची स्तब्धता हिंस्र आणि आक्रमक व्हायची. त्या कर्कश, रौरव नशेच्या रुद्र झोतांमध्यें मन भण्ण होऊन पडलेलं असायचं. कानांना रातकिड्यांच्या किर्र करवती लागलेल्या असत. मुकी मेणबत्ती : गरम मेणाचं थारोळं : संकोचत जाणारी वात : रुंद ज्योतीचा पाण्यासारखा फडफडता, डोलता, स्तब्ध पदर : धुराची झरझर रेष. ज्योतींत हालणाऱ्या भिंती, सांवल्या : ताठ डोळे : तारवटलेली शांतता.

दारूमुळें सगळं अंग गरम व्हायचं. सीलबंद वेगवान् सुम्म् रक्ताभिसरण. पुढें पुढें तोंडांतल्या पेयाची चव कडवट व्हायची. तोंडाला चूळ सुटायची. आतडं हिसके घ्यायचं. या पेक्षां कुठेहि जाऊन कोणाशीहि कांहींहि बोलत राहावं असं मनांत यायचं.

पण रात्रीं अडीच-तीन वाजेपर्यंत मी नुसताच बसून असायचा. बाह्य जगाशीं फक्त ग्लासापुरता आणि लघवीपुरता माझा साक्षात् संबंध असायचा.

मध्येंच तरसाचें ओरडणें किंवा खोकणें किंवा हास्य ऐकायला येई.

युकॅलिप्टसमधून सळसळत जाणारा वारा.

बाहेरची उभी गगनचुंबी अभेद्य रात्र.

अडीचच्या सुमाराला मला थकवा यायचा. सिगरेटींची चव जायची. घशाला शोष पडायचा.

नंतर तासाभरांत मी झोंपून जायचो.

## १५

मला मुलं आवडतात, पण स्वतःला मुलं असणें ही गोष्ट जरी शरीरसंबंधांतून ओघाओघानें आली तरी तिचा मी विशेष विचार केलेला नव्हता. विजूला मूल होणं झेंपणार नाहीं असं अगोदर एका तज्ञानें सांगितलं होतं. एक संबंध किडनी कामांतून गेल्यामुळें

वाळंतपणांत ती दगावण्याचाच संभव होता. ह्या भीतीला तोंड द्यायला डॉक्टर तेंडुलकरांनीं पहिल्यांदा तिला शिकवलं. आम्हीं मुंबई सोडली तेव्हांच तिला दिवस गेलेले होते. नंतर सतत ही भीति वर डोकं काढायची.

आईबाप होण्याचं भय शारीरिक समाधानापेक्षां नेहमींच अलग राहातं. लग्न झालेल्या मुलींच्या शारीरिक ओढीच्या आड तें येत असेल—येतंच—पण केवळ सामाजिक आणि कौटुंबिक जबाबदारीचं तें भय नसतं.

मूल होण्यामुळें वैयक्तिक स्वातंत्र्य तर कमी होतंच, पण जीवनांतले सगळेच व्यवहार एका जबाबदारीला जखडले जातात.

पण आणखीहि एक भयंकर प्रश्न सतत आडवा येतो. ज्या जन्माचं बंधन आपल्यावर पडलंय् त्याच जन्मांत आणखी एक जीव लोटायला कारणीभूत व्हायचं—जणुं काय एखादा संक्षिप्त परमेश्वरच होऊन कोणाला जन्माला घालायचं.

माग ह्या जगांतलं राजकारण, इथला समाज, इथल्या सगळ्या धडपडी आणि लढाया—ह्यांना आपण जबाब देऊं लागतो.

खरं म्हणजे जे जे जबाब आपण देऊं लागतच असतो—ते ज्याला प्रथम द्यायचे त्याला आपण निर्माण केलेलं असतं.

हें संभोगांत अभिप्रेत नसतं; हें प्रेमांत अभिप्रेत नसतं.

संभोगांत विझण्याचा रोख घेऊन भडकत राख होणारे लोक जन्मापेक्षां मृत्यूलाच सामोरे जात असतात. प्रेमाला स्वतः होऊन कांहींच उत्पन्न करायची ताकद नसते. ह्या शक्तींचा वाटेल तसा उपयोग होतो. पण मुलाला जन्म दिल्यानें माणसाच्या वागण्यांत उद्देश यायला हवा—एक तर तें मूल स्वहस्तें नष्ट करावे, किंवा त्याच्यासाठीं सगळं जग मोकळं करावं.

गुलामांनाहि मुलं होतातच. पण ती स्वतंत्र व्हावीत असं त्यांना कां वाटतं ?

कीं मुलं म्हणजे **स्वतःची मालमत्ता**—स्वतःच्या अनियंत्रित **सत्तेची** प्रतीकं ? आणि म्हणूनच ही काळजी कां ?

कोणालाच हें नीट सांगतां आलेलं नाहीं, येऊनदेखील ध्यानांत घेतां आलेलं नाहीं.

खरं म्हणजे आईबाप बनलेले लोक मुलांवर प्रेम करूनसवरूनहि त्या मुलांना पोरकींच ठेवत आलेले आहेत. महायुद्धं, अत्याचार, गुलामी, आर्थिक सत्तेवर आधारलेली दडपशाही, आंधळे संस्कार, परंपरा, फोल व्यवहार—हें सगळं सगळेच जन्माला आलेल्या मुलांना सोपवतात. नुसतं हेंच नव्हे, तर खरे खोटे प्रश्न, तत्वज्ञानं, धर्म, नीतिशास्त्रं—ज्या ज्या गोष्टींनीं आईबापांचं मुर्दाड जग सजवलं आणि साजरं मानलं. . . .

एक निनावी राक्षस आम्हीं जन्माला घालूं बघत होतो. माझ्या फक्त मनांत कुठेतरी तो वाढत होता. मी त्याला बांधलों होतो, जबाब देऊं लागत होतो. माझ्या बापानें मला उत्पन्न केलं तेव्हां तोहि मला हेच जबाब देऊं लागत होता. किंवा कोणीच कोणालाच केव्हांहि कसलाहि जबाब देऊं लागत नव्हता. समजा लग्न न करतांहि मी कोणताहि विचार न करतां केवळ नैसर्गिक कडेलोटापोटीं स्त्रीला नकळत फळवली असती तरी हें एक नवं अस्तित्व कोणालाच न जुमानतां ह्या प्रश्नचिन्हांच्या आणि काळोख प्रकाशाच्या भुंक्या आणि भयंकर सत्ताहीन आणि सार्वभौम जगांत आलंच असतं. तेंहि रस्तेच हिंडलं असतं, आयुष्यच हुंगलं असतं, दंगलं असतं, फाटलं असतं, आक्रोशलं असतं, पिळवटलं असतं, घुसमटलं असतं, गुदमरलं असतं, खुनी—शोधक—हिंस्त्र—नागडं परमेश्वरी आणि अपरंपार झालं असतं, दगावलं असतं.

सतत जन्मापाठोपाठ जन्म घेणारे आदिमानव—त्यांत आणखी एक आमच्या दोन मांड्यांमधून आरपार जाणारं आमच्या आवाक्याबाहेरचं विध्वंसक आणि जन्मेच्छु सूत्र.



'सेल्फ पोर्ट्रेट'

## १६

इथिओपियाचा राज्य कारभार पाहून वारंवार काफ्काच्या "किल्ल्या"ची आठवण होते. कारभार चालतो अत्यंत हळू, त्यांत चुका, गफलती, विलंब, दडपादडपी, अफरातफर, ओढाताण—असल्या गोष्टी अतोनात आहेत.

पण तथाकथित लोकशाहींतसुद्धां हें होतं म्हणून ह्याची नवलाई विशेष वाटत नाहीं. इथिओपियांतली सगळीं सत्ता हायले सेल्लासीच्या हातांत एकवटलेली आहे. त्याच्या इच्छेनुसार ती चालवली आणि वापरली जाते. थोड्या वर्षांपूर्वीपर्यंत **रास** पदवी असलेल्या सरंजामदारांच्या हातींसुद्धां पुष्कळ सत्ता होती. अफाट मुलुख आणि गडगंज पैका अजूनहि ह्यांच्याकडे आहे. पण शासनाचे अधिकार मात्र त्यांच्या हातून निघून आता तरुण शासनदारांच्या हातांत आलेले आहेत. एक नाममात्र पार्लमेंट ह्या देशांत आहे खरें, पण त्याच्या कामगिरींत विधिघटनेंत असलेल्या गोष्टीच होत असतात.

अनुक्रमणिका


LIFEBUOY
for health

आदिस अबाबा शहरांतले स्वयंचलित ट्रॅफिकचे दिवे आणि पार्कींग मीटर्स हे जसे सार्वजनिक करमणुकीचे विषय आहेत, तसेंच पार्लमेंट आणि कोर्ट हेहि विनोदाचेच विषय आहेत.

अर्थात् इथिओपियन जनतेचे सर्वच्या सर्व कर ह्या करमणुकीवर खर्च होत असतात ह्यांतहि नवल नाहींच.

ह्या गोष्टींना तोंड फुटलं तें जनरल मंगीस्तू नेवाईनें केलेल्या अयशस्वी राज्यक्रांतीच्या प्रयत्नांत. रीत आणि देखावा म्हणून मंगीस्तूवर खटला झाला. देशद्रोहाच्या आरोपाखालीं सुप्रीम कोर्टाच्या खास चौकशींत मंगीस्तूला आपला बचाव देण्याचीहि सवड दिली गेली.

ह्या खटल्यांत मंगीस्तूनें केलेल्या भाषणाचा साद्यंत वृत्तांत मला इथिओपियन माहिती खात्यांतल्या कांहीं लोकांकडून मिळाला. ह्यांतले दोघे पुढें फरारी होऊन इजिप्तला गेले.

आपल्या खटल्यांत मंगीस्तूनें प्रथमच खटला चालवणाऱ्या न्यायालयाला कळसूत्री म्हणून स्वतःचा स्वर्गाचा रस्ता खुला करून घेतला. सहा फुटांवर उंच असलेला, धिप्पाड, बंदुकीच्या दारूनें बुबुळांचा रंग उडून गेलेला मंगीस्तू जेव्हां बोलूं लागला तेव्हां हजर असलेल्या अनेक सरकारी नोकरांच्यासुद्धां मनांत अनेक उलथापालथी झाल्या असतील, देशांतील बेकारी, अनागोंदी कारभार, लांचलुचपत, अन्याय—ह्या गोष्टींना तोंड फुटलं. मंगीस्तूच्या भाषणानंतर अनेक दिवस देशांतले सुखासीन तरुण आरशांत स्वतःची तोंडं बघूं शकले नसतील.

औद्योगिक क्रांतीचा स्पर्शसुद्धां ह्या देशाला जेमतेम झालेला आहे—तोहि बिर्ला आणि सरकार यांच्या भागीच्या रूपांत, किंवा इतर देशांतून आलेल्या कारखानदारांमुळें. जमिनी अजूनहि सरंजामदारांच्या ताब्यांत आहेत. कांहीं लोकांच्या मतें तर सम्राटानें मुद्दामच औद्योगिक सुधारणा दूर ठेवलेली आहे, कारण ती येतांच मजूरवर्ग निर्माण होईल, एकवटेल आणि सत्तेच्या सार्वभौम स्वयंचलनांत अधिक्षेप करील.



जरा मॅचबॉक्स देतां कां ?

ह्या देशाचा सुपीकपणा हेंच ह्याचं सध्यां दुर्दैव आहे. कारण उधळाल तें उगवेल असा ह्या देशाच्या जमिनीचा गुण. दोन वेळचं जेवण कोणालाहि कसंहि मिळतं. त्यामुळें, आणि शेकडों वर्षांच्या सरंजामशाही वातावरणामुळें ही माणसं अतिशय आळशी आणि दैववादी बनलेली आहेत.

पण जातीयतावाद आणि धार्मिक भेद यांचा परिणाम म्हणून कीं काय, असंतोष सर्वत्र आहे. अम्हारा जातीचं वर्चस्व हें उदाहरणार्थ तिग्रे लोकांना फार खुपतं. एरिट्रियन लोकांचा तर इथिओपियापासून फुटण्याचा चंगच आहे. शिवाय मुसलमान आणि धर्महीन गाल्ला लोकांची संख्या ख्रिश्चन अम्हारांपेक्षां जास्तच आहे. व सरकारांत ह्या लोकांना प्रतिनिधित्व नाममात्रच आहे. कायदा अंमलांत येतो तेव्हां यांच्यावर नेहमींच अन्याय होतो.

अशा देशाला काबूंत ठेवणं हायले सेल्लासीला शक्य झालं याचं कारण त्याची राजकीय प्रतिभा. लोकां चंप्रेम आणि भय ह्या दोन्हीं गोष्टी त्याला लाभल्या आहेत. बंड मोडतांनाच तो परत आला. तेव्हां रस्तोरस्तीं हजारोंनीं त्याचं अक्षरशः धुळींत लोटांगण घालून स्वागत केलं कारण आपल्या दीर्घ कारकीर्दीत थोडासा कायदा, पुष्कळसा वचक आणि अफाट दरारा त्यानें प्रस्थापित केला आहे. सुरुवातीला त्याला आपल्या बापाची—रास मकोनेनची—राजकीय आणि लष्करी ताकद उपयोगाला आली. पण नंतर त्यानें स्वतःच्या वकूबावर आणि दूरदृष्टीवर हें साम्राज्य एकछत्री बनवलं आणि नीट चालवलं. कांहीं बाबतींत त्यानें सुधारणाहि भराभर केल्या. पण त्याच्या यंत्रणेंत खाजगी सत्तेचा आणि लहानसहान सत्ताधीशांचा वाटा मोठा असल्यानें आणि सत्ता नेहमींच टिकावाचें आणि वाढीचें धोरण आक्रमीत असल्यामुळें सुधारणा अडकल्या. कारभाराचें यंत्र पूर्वीच्या मानानें कार्यक्षम झालें तरी त्याचें कार्य विकृतच राहिलें.

मंगीस्तूच्या बंडानंतर पुन्हां सुधारणा होऊं लागल्या.

सम्राटाचा थोरल्या पुत्रावर फारसा विश्वास कधींच नव्हता. मधला त्याचा सर्वांत आवडता. तो अपघातांत मरण पावला. आणि अलिकडेच त्याचा धाकटा मुलगा मरण पावला. राणीसुद्धां आतां हयात नाहीं. थोरला अस्फा वोसेन आणि मधल्या मकोनेनचा मोठा मुलगा—यांच्यापैकीं कोणीतरी यापुढला सम्राट होणार. परंपरेप्रमाणें युवराज अस्फा वोसेनच पुढला सम्राट होईल. पण त्याची सत्ता राजवाड्याच्या कांपाऊंडाबाहेर फारशी जाणवणार नाहीं. सम्राट् हायले सेल्लासीच्या नंतर सॉलोमन आणि शीबाच्या अखंड वंशांत मोठा सम्राट् किंवा साम्राज्ञी व्हायची नाहींत.

कारण आपल्या प्रदीर्घ कारकीर्दीत हायले सेल्लासीनें निदान ह्या पठारी जुमल्यांना एकत्र आणून त्यांचं एकसंध राष्ट्र बनवलं आणि त्याला कारभाराचं थोडं तरी वळण लावलंच. दुसऱ्या मेनेलिकच्या कारकीर्दीत देशावर एकछत्री सत्ता पसरली खरी, पण कारभार आधुनिक केला तो हायले सेल्लासीनेंच. जरी त्यानें केवळ अनागोंदी नोकरशाही उत्पन्न केलेली असली, तरी ती पूर्वीच्या कारभारापेक्षां निदान रचनेंत आधुनिक आहे.

निदान हल्ली एक कागद हजारों खुर्च्या टेबलांवरून मळ खात मैलच्या मैल फिरून न्यायाची धूळ खातो. एका तळहातावर थुंकी झेलीत दुसऱ्याची मूठ मानेवर पातं घालीत नाहीं. ही सुधारणाच. पूर्वी लूट व्हायची तिला आज कर म्हणतात, हीहि सुधारणाच. आज शिक्षणाचा प्रसार होतोय्—तोहि सार्वत्रिक, मोफत आणि सरकारी खर्चानें. दवाखानें चालतायत. पोलीस आहेत—चोरांना चोर म्हणवून घेतां येत नाहीं, वगैरे इथल्यासारख्या सुधारणासुद्धां आहेतच. इथें ब्रिटिश नव्हते तरी असं होऊं शकलं हें ध्यानांत घ्यायलाच हवं. . . .

शिक्षणानें आणि नोकरशाहीनें इथें एक मध्यमवर्ग निर्माण केलेला आहे. सरकारी खर्चानें शिकून डिग्री मिळवणारा विद्यार्थी एकदम तीनशें ते साडेचारशें डॉलर पगाराची सरकारी नोकरी मिळवतो. तावडतोब तो मोटार खरेदी करतो, घरांत बाई आणतो किंवा रात्रीं नगरपर्यटन करतो, दारू पितो, इंग्रजी बोलतो, सूट घालतो आणि त्याची इतिश्री होते. तो शेतकीतज्ज्ञ होऊन अमेरिकेहून नुकताच आला असेल तर आरोग्यखात्यांत किंवा बांधकामखात्यांत त्याला नोकरी देण्याची सरकार दक्षता घेतं. तो इकॉनॉमिक्स शिकला असेल तर त्याला शिक्षणखात्यांत नोकरी मिळेल. आणि व्यापार किंवा अर्थखात्यांत नोकरी मिळवायला त्याला इकॉनॉमिक्सचा उपयोग व्हायचा नाहीं. अलिकडे हें कमी झालंय्. पण होतंच. हेंहि मुद्दाम केलं जातं असं सरकारचे टीकाकार म्हणतात.

हा मध्यमवर्ग हळू हळू कारभार हातांत घेईल. तसं झालं तर ह्या देशांत राजाऐवजीं खाजगी भांडवलदार यायला वेळ लागणार नाहीं.

सुदैवानें बोथट संस्कृति आणि अवजड परंपरा यांचें आफ्रिकन माणसावर फारसं वर्चस्व नाहीं. तडकाफडकी सुधारणा करायला हे लोक आपल्यापेक्षां अधिक काबिल आहेत कारण ते जडवादी आणि चटकन् कार्यक्षम होऊं शकणारे लोक आहेत. पंधरा वर्षांनीं ह्या लोकांनीं जगांत सर्वांत निरोगी, संपन्न आणि समतावादी राष्ट्रं स्थापलीं तर मला मुळींच नवल वाटणार नाहीं. आपल्यासारखा इतिहासप्रसिद्ध मुर्दाडपणा त्यांच्यांत नाहीं—जो आहे तो तात्पुरता आहे—आणि एवढ्या मोठ्या, सुपीक निसर्ग-समृद्ध देशाची लोकसंख्या फक्त दोन कोटी असल्यामुळें आपल्यासारखा दीड-दांडी अर्थव्यवस्थेचा तराजू त्यांच्या व्यवहारीं नाही. नसो. उद्यां इथले लोक जातपात, धर्म, प्रांतीयवाद, भाषावाद ह्या गोष्टीं विसरून जातील, तर राष्ट्रीयत्व आणि आंतरराष्ट्रीयत्व—पर्यायानें मनुष्यत्व—अंगीं रूजून ते आशियाई लोकांना मागे टाकतील. पुढली पंचवीस वर्षं दक्षिण अमेरिका आणि आफ्रिका ह्यांची आहेत. दुसऱ्या संस्कृती एकमेकींवर टक्कर घेत किंवा अंतर्गत क्षयापायीं खलास होऊन जातील.

मला राजकारण आणि इतिहास ह्यांत अक्कल नाहीं. पण दोन्हींत माझे विचार अनेकदां गुंततात. कदाचित् जगाच्या जुन्या संस्कृतींना आणि वृत्तींना कंटाळून मी मुद्दामच असें म्हणत असेन. पण आफ्रिकन आणि दक्षिण अमेरिकन लोक निराळ्याच संस्कृति उभारतील अशी चिन्हं मला आत्तांच दिसतायत. ती तिथल्या माणसांच्या विचारांपेक्षां व्यवहारांत दिसतायत म्हणून मी जास्त सुसंस्कृत लोकांपेक्षां त्यांच्यावर अधिक विश्वास ठेवतों.

(१७)

ठाकूरला आपल्या पौरुषाची कितपत शाश्वति आहे, कोण जाणे. कोणाहि बाईबरोबर झोपला तरी दहाजणांत तो त्याविषयीं वकवास करणारच. दारू पिण्याबद्दल हेंच. प्रत्येक ठिकाणीं शर्थ, प्रत्येक ठिकाणीं पुकार.

मला ठाकूर जवळचा मानायचा कारण मी आयुष्यांत रस घेतो असं त्याला वाटायचं. आमच्या आवडी सारख्या पण निवडी निराळ्या असायच्या.





अनुक्रमणिका

ठाकूरला जियें तियें मोठ्या प्रमाणांत, भडकपणें आणि ऐश्वर्य जाहीर करत कांहींहि करायची संवय होती. म्हणजे सगळं महाग पडलंच पाहिजे आणि लोकांना दिसून आलंच पाहिजे.

व्हिस्की म्हटली कीं, अठरा डॉलरची ब्लॅक् अँड व्हाईटच हवी. पैसे कमी खर्च झाले तर त्याला नशा कमी यायचा. रांडेकडे जायचं तरी बरोबर दोघे तिघे हवेतच. इथें आमचं पटायचं नाहीं. एक तर माणूस विकत किंवा भाड्यानें घेण्याची कल्पनाच मला पटायची नाहीं. आणि खुशीचा खर्चाशीं मी कधीं संबंध जोडला नाहीं. जेव्हां मी खिशांतले पन्नास साठ डॉलर नकळत खर्चून टाकत असे तेव्हां ठाकूर माझी ही कृति चारचौघांच्या लक्ष्यांत आणून देऊन "ह्याला म्हणतात श्रीमंती" अशी स्तुति करायचाच, इथें त्याला आणखी उर्दूचा उपयोग व्हायचा, तो वेगळाच.

मल्य नेहमीं गप्प असायचा. खरा पैशाबाबत उदासीन तोच. पण त्याचं कधींच लक्ष्यांत यायचं नाहीं.

मी आणि ठाकूर बोलून जवळ आलों. मी आणि मल्य न बोलून मित्र झालों.

अनोळखी देशांत माणूस जोंवर अनामिक असतो तोंवर मोकळाच राहतो. त्याला कुठलीच मूल्यं जखडत नाहींत. ठाकूर ह्यांत भरकटला. मल्य ह्यांत स्वच्छ झाला. मी नुसताच आरपार राहिलों.

असेल्ला हॉटेलच्या गावठी बारमध्यें आम्हा दोघांसमोर जेव्हां ठाकूर वेट्रेसला गोंजारायचा तेव्हां मल्य एकदम गंभीर व्हायचा आणि ग्लासाबाहेर बघायलाच तयार व्हायचा नाहीं. माझी आणि ठाकूरची क्वचित् थंड नजरानजर व्हायची. मग मल्य ताड्कन् उठून जायला निघायचा. ठाकूरचा प्रणय थांबायचा. मल्य परत बसायचा, आणि इहलोकींच्या गप्पा परत रंगायच्या. त्यांत ठाकूरच्या वशीकरणांच्या कहाण्या, बलात्कारांच्या आणि भानगडींच्या गोष्टी–ह्याच बाहेर पडायच्या. अशा वेळीं मात्र मल्यला एकसारखं हसू यायचं. ठाकूरला त्यामुळें जास्तच नशा चढायची. स्वस्त काव्य, खपाऊ रंगेलपणा, पण दोस्तीचा मोकळा कैफ–एवढ्यावर दुपार उंच चढायची किंवा रात्र रंगायची.

अचानक ह्या दोघांचे आवाज मला ऐकूं येतनासे होत. खोली अदृश्य झालीशी व्हायची. डोकं सुम्म, आणि गरम्म् व्हायचं. भलत्याच आठवणी असंबद्धपणें व्हायच्या. नशेंतल्या नशेंत मी बध्यड आणि कासावीस होऊन जायचों.

मग ओव्हरकोट उचलून बाहेर पडतांना बारमधून बाहेर येणाऱ्या तर्र कोलाहलाच्या गुळण्या अंगावर येत. गप्प गारेगार काळोखांत झोकांडी जायची. एकदां पाऊल ठरलं कीं, तीन टॉर्च तीन दिशांना जात. प्रकाशाचे तीन पिवळट अंधुक पट्टे धुक्यांत गडप होत.

युकॅलिप्टसमधून वाहणाऱ्या वाऱ्याची विलक्षण सळसळ शहाऱ्यासारखी लाटेवर लाट यायची.

क्वचित् आठवायचं, विजूच्या पोटांत एक मूल वाढतंय्. गर्भाशयांतल्या काळोखांत त्याचे सजीव पाय झगडताय्त. हॉस्पिटलांत राहून आलेल्या कोणाहि माणसाला जन्म मरणाच्या जंतुघ्न आणि शस्त्रसज्ज मंदिरांत वाटणाऱ्या शरमेचा अनुभव येतो. मी मुंबईला जे. जे. हॉस्पिटलांत होतों तेव्हां दहा दिवसांत माझे तीन शेजारी मरून गेले. आणि उघड्या वॉर्डांत रात्रीं कण्हण्याचे आणि विव्हळण्याचे आवाज ऐकत चिरलेल्या पोटाचा ठणका सांभाळत एनिमापॉट्स् आणि नर्सेसच्या गराड्यांत पडून राहिल्यावर काय वाटतं तें मला कळलं.

मुंबईंत विजू तीनदां मरतां मरतां वाचली होती.

आणि शेवटल्या खेपेस डॉक्टरनें स्वच्छ सांगितलं होतं कीं, हिला बाळंतपण कधींच झेपायचं नाहीं. संबंध खराब झालेली किडनी ऐन वेळीं दगा देईल आणि ही मरेल. सोशिकपणा आणि शांतपणा ह्या दोन गोष्टी विजूंत आहेत. आणि डॉक्टर तेंडुलकरांनीं तेव्हां धीर दिला, म्हणून आधाराला कोणतीच आशा नसतांना, प्रसिद्ध डॉक्टरांच्या धोक्याच्या सूचना धुडकावून, हें मूल पोटांत वाढवायचं धाडस केलं.

मला ह्यांत कांहींच ठरवायचा हक्क नव्हता. शरीरांच्या झगडत्या जुडीचाच तेवढा अनुभव असलेलं एखादं पोरसवदा जोडपं अशा वेळीं जसं गांगरून जाईल तसे आम्हीहि गांगरलो होतो. मग तिच्या वाढत्या, मोठाल्या होणाऱ्या पोटाची आणि आंत लाथा झाडणाऱ्या दिवसामासानें नवे पूर्वनियोजित अवयव शोधून काढणाऱ्या गर्भाची मला संवय झाली.

आम्ही मधूनच मुलाबद्दल बोलायचों. विजूला मुलगी व्हावी वाटायचं. ह्या गृहीत धरलेल्या मुलीचं नांव मी जुई असं ठेवलं होतं.

डॉक्टर निकलसन् ऑस्ट्रेलियन आहे. सहा फूट उंच, वाळकी, निळ्या डोळ्यांची, पांढऱ्या एप्रन्मध्यें चालत ती यायची.

तिचा नवरा डॉक्टर हॅमलिन्. त्याचे करडे केस. वेडसर विसरट डोळे.

त्या दोघांची आमच्यावर माया होती. मला त्यांच्याबद्दल कांहींच म्हणायचं नाहीं.

स्वच्छ हॉस्पिटल. बोलघेवड्या नर्सेस. इथें दीड महिना विजू पोटांतलं धडपडतं मूल घेऊन आता मरते कीं, मग मरते अशी पडलेली.

आता ह्यांतलं आठवणारं सगळंच सांगावंसं वाटत नाहीं.

शाळा बंद झाली. सुट्टीचा पगार घेऊन मी आदिसला आलों. विजूचा मुक्काम हॉस्पिटलांत होता. मी डॉमिनिक नांवाच्या मित्राच्या घरीं उतरलों होतों. पण बहुतेक वेळ हॉस्पिटलांतच असायचों.

ह्या दिवसांत मी आदिसचे रस्ते भटकलों. पिआझ्झाहून एअरपोर्टपर्यंत–हॉस्पिटलपर्यंत जे दोन अडीच मैलांचं अंतर आहे त्याचे

असंख्य रात्रीं घनपाठ केले. पिआझ्झापासून हायले सेल्लासी थिएटरपर्यंतचा प्रशस्त झगमगता उतार चालतांना पायांखालच्या डांबरावर उमटून विझणारीं लाखों लाल नि जांभळी अक्षरं वाचली. बाजूच्या कुंटिणखान्यांचे लाल आणि हिरवे दिवे, रांडाचे तेलकट प्रकाशांत चमत्कारिक चकाकणारे आकर्षक सदैव दूर चेहरे बघत, ALIMENTARI, CARNE, FRUITTA VERDURA, VINI, POMPE, FUNEBRI अशा इतालियन पाट्या वाचत गॅसच्या दिव्यांच्या पुलावरून चालत चालत थेट उतरत गेलों. ऐकलीं ट्रंपेटस्, ऐकले ड्रम्स्. सॅक्सोफोनचा सोनेरी वळसा. क्वचित् उंच स्टुलावर वसून फेसाळ बिअर घशाखालीं लोटून पुन्हां पकडला रस्ता. मग वस्ती विरळ झाली. क्वचित् भेटल्या तीनचार डॉलरला उपलब्ध होणाऱ्या गल्लींतून एकदम बाहेर येऊन स्वतःला देऊ करणाऱ्या पंधरासोळा वर्षांच्या शाळकरी मुलीं. एकदां पाहिली एकीची झगा पुन्हा पुन्हा वर करणारी सौद्याची गिरकी. घुटमळंलोसुद्धां. आत कपडा नव्हतां. आणि दोन पायांतली स्पष्ट दिसली चीर.

ऐकली साद घालणारी, खंत करणारी अम्हारिक गाणीं. अब्बाये नदीचं पाणी...आल्माझ्‌ग पोरी...नंतर काळोखांत धांवणाऱ्या सुसाट मोटारी... नंतर हॉस्पिटलचं आवार. नंतर चक्राकार जिना. एखादं स्ट्रेचर्. एखाद्या नर्सचं थकलेलं स्मित. विजूच्या खोलीचा बंद दरवाजा. आंत शिरलो. गुंगींत होती.

मग कळलं माझा हात तिच्याहिपर्यंत कधींच पोचूं शकत नव्हता.

आरामखुर्चीत बसून मोजले लाखो सेकंद. कोळ्यासारख्या सूक्ष्म पायांनीं डायलभर धावणारे सूक्ष्म गोल, गोल.

अशाच एका रात्रीं पुन्हां अचानक ग्रॅहॅम आपलं जुनाट मर्क्युरीचं घूड घेऊन आला. "ला मस्कोत" ह्या नाईट क्लबांत गेलों. धूसर प्रकाशांत फिरले स्पॉटलाईट क्रमाक्रमानें वाया नागड्या झाल्या. ती इजिप्शियन् बाई. कोमेजलेल्या केवड्यासारख्या तिच्या मांड्या. बेंबीवरून खाली सरकलेला स्पॉटलाईट. पितळी बँड, ग्रॅहॅम् दोन तास भलतीकडेच नाहींसा झाला. दोन सोन्याचे दांत असलेली, खंगलेली, तिखट काळ्या डोळ्यांची, नक्कीच सिफिलिसनें कुरतडलेली मुलगी माझ्याजवळ आली. माझ्या शेजारीं बसली आणि म्हणाली, "मला व्हिस्की पाजणार कां ?"

मी म्हणालों, "माझ्याजवळ फक्त दीड डॉलर आहे."

ती म्हणाली, "खोटे कशाला बोलताय्? तुम्हाला मी नको आहे".

मी म्हणालो, "खरोखरच दीड डॉलर आहे फक्त."

ती म्हणाली, "माझं ऑपरेशन झाल्यापासून मला वाईट दिवस आलेत. आता मी कोणालाच हवीशी वाटत नाहीं."

"दुर्दैव," मी म्हणालों.

मी तिला एक सिगरेट दिली अन् पेटवली.

कुठूनसा ग्रॅहॅम आला. पूर्वी तिच्याबरोबर झोंपला असावा. कारण त्यानें तिची विचारपूस केली, तिला ड्रिंक घेऊन दिलं.

तीन वाजले होते. शो संपला. आम्हीं तिथे बाहेर पडलों. ती मुलगी ग्रॅहॅमला म्हणाली, "मला घरीं पोचव."

## अंदमानच्या अंधेरींतून :

# निरोप

माझा देहपात होऊन माझ्या अस्थि आणि रक्षा कोठें पडतील याचा नेम नाहीं. अंदमानचें वातावरण आधींच निर्जन व भेसूर आहे. तेथें वाहणाऱ्या नदीनाल्यांचा उदासवाणा आवाज तेथील मूळच्या निर्जनपणाला अधिकच भेसूर बनवीत असतो. कदाचित माझ्या अस्थि नि रक्षा त्या उदास नदीनाल्यांच्या जवळ पडून राहतील. किंवा असेंही घडेल कीं मध्यरात्रीं आपला नियत खेळ आकाशांत खेळणाऱ्या तारकांचें प्रतिबिंब पोटांत सामावून घेणाऱ्या गंगामातेच्या स्फटिकशुद्ध प्रवाहाच्या शेजारीं कोठेंतरी माझ्या अस्थि नि रक्षा पडून राहतील! त्या कोठेंही पडलेल्या असोत! श्रीरामानें आपल्या आवडत्या लोकांचा पक्ष विजयधवल ठरविला आहे. दुष्टांना माघार घ्यावी लागली आहे आणि त्यांचा पाय जेथून पुढें पडला आहे. तेथवर त्यांना मागें हटविण्यात आलें आहे. आपला हा भारत-वर्ष वैभवांत उभा आहे. मानवजातीचे मार्गदर्शन करणारा दीपस्तंभ म्हणून यापुढें तो तेजस्वितेनें तळपत राहील असा पुकारा झाला आणि "हौतात्म्य गाजविणाऱ्या विचार वीरांनो आणि कृति वीरांनो, तुम्हीं ज्या संग्रामांत लढलांत आणि पडलांत तो संग्राम यशस्वी झाला. उठा!" अशी घोषणा झाली कीं, त्यावेळीं, त्या पडून राहिलेल्या अस्थि आणि ती पडून राहिलेली रक्षा यांच्यांत फिरून तेज आणि चैतन्य सळसळूं लागेल.

तोंवर, प्रिय मित्रांनो, रामराम!!

"चल्," ग्रॅहॅम म्हणाला, "पण अगोदर ह्याला सोडतो."

"अगोदर मला सोड"

"वरं, काय रे ?"

"वरं" मी म्हणालों.

ग्रॅहॅमनें गाडी चालूं केली आणि वेग सत्तरावर नेला. मी एकटा मागच्या सीटवर होतों.

ग्रॅहॅम म्हणाला, "तुझं नांव काय ग ? मी विसरलोंच."
"झेन्नबेच्"
"छे: कलामोवर्क !"
"कलामोवर्क कुठलं ! आल्माझ् माझं नांव"

"नीट आठवून सांग"

"वरं, आव्ववेच्"

"राह्यलं. वय ?"

"अठरा"

"अठरा ?"

"वरं, राह्यलं. ऍंशी ! झालं ?"

"Damn ! घर कुठंय् तुझं ?"

"समोरच्या नाक्यावर"
"इथें ?"

"अरे ? इथें नाहीं. पुढें असेल"

"असेल म्हणजे ?"
"बहुतेक पुढल्या वळणावर आहे."
"ठीक. . . . . . . . . . . . . . . . .हं इथें ?"
"अं. . . मला नाहीं वाटत इथें असेल. डावीकडे वळव."
"हं. . . आता ?"

"इथे कुठलं आलंय् ?"

ग्रॅहॅमनें गाडी थांबवली. दोन्हीं हात हवेंत झटकून तो म्हणाला, "साडेतीन वाजलेत. ह्याला घरीं सोडायचंय्. कृपा करून नक्की सांग..."

पुढल्या वळणावर ती उतरली. मग ग्रॅहॅम पुटपुटला, "Silly bitch! They are all lovable—and terribly annoying! The truth is, I have enough petrol for a long ride but hardly any money for a fuck!

"I think I rather enjoyed it from the backseat."
"One enjoyes it only in the bed—backseats are only for emergencies."

"Quite. At one point I felt like jumping out of the car."

"Hell, I don't mean that."

मला हें ठाऊकच होतं.

नंतर ग्रॅहॅम म्हणाला, "एकदां तुझ्या मराठी कविता भाषांतर करून दे कीं, मी छापून आणतो इंग्लंडांत."

"वरंय्" मी म्हणालों, "एकदां हें मूल जन्मूं दे. मग बघूं."

"विजया कशी आहे ?"

"अजून मरतेयच."

"सॉरी !—सगळं ठीक होईल. पहिल्या वेळीं मी आणि मेरिएल्...." मेरिएल वेगळी झालेली होती. पण ग्रॅहॅम बोलतांना तें विसरून जायला बघत होता.

मग मी लवकरच उतरलों.

### १८

मी ओरडलो, खून खून. मुलगा जन्मला. विजू गुंगींत. अॅनेस्थेशिया. मिठाई. गॅस.

सिस्टर क्लिमेंट रक्तानें माखलेल्या एप्रनमध्यें घाईघाईंत पांढरी-शुभ्र आली आणि म्हणाली, "I've never seen such a beautiful baby! He's lovely! Just like his mother !"

"How's she ?" मी घोगऱ्या आवाजांत विचारलं, खून खून. तिचे रबरी मोजे रक्तानें माखलेले. थिएटरचे दरवाजे खुले.
"We had an anxious time"—

"How's she?" खून खून. सगळं हॉस्पिटल लखलखलं गरागरा. "but, you know, Doctor Hamlin is such a...There she comes..."

"एक स्ट्रेचर खडखडत येतं. सफेत कपडे. खून खून.
औषधाची तीव्र झुळुक आली.
विजू जिवंत होती.

अनुक्रमणिका






मग एक नर्स मला नर्सरीत घेऊन गेली. तिथें मुलंच मुलं होती. मग एक लेबल वाचून तिनें मला माझा मुलगा दाखवला.

ऑक्सिजनच्या निवाऱ्यांत तें मूल झोपलं होतं. मग त्याचे डोळे उघडले. माझी सावली त्यांच्यावर पडली असेल. Menacing colours, attacking, assailing colours...

खून खून. मी कोवळा झालो. गळा दाटला.

१९

उन्हाळ्या-पावसाळ्याची वार्षिक सुट्टी सुरू झाली.

विजूला हॉस्पिटलांतून परतायला अनेक दिवस लागले. ती परतल्या-वर कांहीं दिवस आम्ही अँटनी डॉमिनिक् नांवाच्या माझ्या एका मित्राकडे राहिलो. डॉमिनिक् स्वतः तामीळ भाषी ख्रिश्चन् तर त्याची बायको तेलुगूभाषी. त्यामुळें घरांतील भाषा इंग्लिशच होती. डॉमिनिक् कुटुंब अत्यंत श्रद्धावान् कॅथलिक कुटुंब होतं. डॉमिनिकला वादाची अवीट आवड होती. मी त्याच्या धर्मश्रद्धेला डिवचत त्याच्याशी वाद घालायचों. तो संतापायचा आणि नंतर कष्टी व्हायचा. आपण रागावलों ह्याबद्दल त्याला इतकं अपराधी वाटायचं कीं, तो त्यामुळें वाटेल तें करून आपली माफी मागत राहायचा शिवाय "देव माझा गुराखी, देव माझा गुराखी" असं तासभर पुटपुटत बसायचा.

एकदां आमचं परमेश्वरावरूनच वाजलं.

"तू श्रद्धावान् आहेस कीं पुरा नास्तिक ?–"

डॉमिनिकने विचारलं.

मी म्हणालों, "श्रद्धावान् म्हणजे कसा ?"

"तुझा परमेश्वरावर विश्वास आहे का ?"

"आहे" मी शांतपणें म्हणालों "पण 'तो' आहे कीं नाहीं हें मला ठाऊक नाहीं. त्याची कोणाकोणाला गरज असते एवढं मला पटतं–म्हणूनच तो विश्वासार्ह !"

ह्या उत्तरानें डॉमिनिक्ला फारसा आनंद झाला नाहीं.

मी पुढें म्हणालो "कॅथलिसिझम् आणि फ्रॉयडियन मानसोपचार तंत्र ह्यांच्यांत केवढं साम्य आहे !"

"काय ? माझ्या लक्ष्यांत आलं नाहीं !"

"कबुलीजबाबांतून न्यूरॉसिसपासून सुटका मिळवायची आणि पापापासूनहि. अपराधाची भावना न दडपतां ओळखून, उच्चारून, तिच्याबद्दल प्राय:श्चित्त घ्यायचं...."

"न्यूरॉटिक लोक कसलं प्रायश्चित्तच घेतात ?"

"का, ट्रीटमेंटमध्यें जेव्हां कॅथार्सिसची वेळ येते आणि जेव्हां दडप-लेल्या अपराधी आठवणी जाणिवेखालून वर येतात तेव्हां न्यूरॉ-टिक माणसाला प्रायश्चित्तच घ्यावं लागतं !"

"चित्रे, तू कॅथलिक पंथांतल्या एका अत्यंत–छे: छे: असं कसं बोलवतं तुला—"

नंतर मी मुद्दामच क्रूर विनोदांची कास धरली आणि जगांतल्या सर्वच धर्मांची टिंगल केली. इतकी की, पुढे पुढे तर डॉमिनिक् हा कर्मठ कॅथलिक हिंदुधर्माची कड घेऊन माझ्या नास्तिकपणापासून त्याचा बचाव करूं लागला—"at least all religions of its stature have one virtue— they have come to believe in One Universal almighty God!—which people like you, excuse me Chitre, it makes me very sad, and I'll be praying for a change in your beliefs, completely deny–denying yourselves. His grace and shelter...."

> **अंदमानच्या अंधेरींतून :**
>
> **रामराम !**
>
> **मित्रांनो, ईश्वरानें आपल्यापैकीं प्रत्येकाची भूमिका ठरवून टाकली आहे. आपण प्रत्येकानें आपली भूमिका वठवावी या-साठीं आपली तातातूट होत आहे. ईश्वरानें नेमून दिलेली भूमिका वठवीत असतांना, प्रसंगीं जळत्या लाकडांना बांधून, कोंडून पडावें लागेल, प्रसंगीं कीर्तीच्या उसळणाऱ्या लाटांच्या शिखरावर स्वार होतां येईल. कधीं आपण लोकांना दिसूं तर कधीं अदृश्य राहूं. कधीं आपण अवनत होऊं तर क्वचित उन्नत होऊं! जगन्नियंत्यानें कोणत्याहि परिस्थितींत ठेवलें तरी ती परिस्थिति सर्वोत्तम आहे असें मानून आपण असें समजलें पाहिजे कीं, आपलें जीवित कार्य एकाकी पार पाडणें हेंच आपल्या वांट्याचें कार्य आहे.**
>
> **एखाद्या उदात्त पौर्वात्य नाटकांत भरतवाक्याच्या वेळीं नाटकांत मेलेलीं व न मेलेलीं सर्व पात्रें एकत्र जमतात. आपण सगळे इतिहासाच्या अफाट रंगमंदिरांतील असंख्य नटच आहोंत. आपल्या कृतीची प्रशंसा करणारे मानव जातिरूपी प्रेक्षक टाळ्या वाजविण्यासाठीं आपल्या समोर बसले आहेत. हे प्रेक्षक कृतज्ञ व आनंदी बनून जोरजोरानें टाळ्या वाजवतील तेव्हां त्या टाळ्यांचा गरजणारा आवाज दऱ्याखोऱ्यापर्यंत जाऊन दुमदुमेल!**
>
> **प्रेमळ मित्रांनो, तो क्षण येईपर्यंत रामराम!**
>
> **(स्वा. वीर सावरकर यांच्या 'अंदमानच्या अंधेरींतून' मधून)**

पुष्कळ ताणल्यावर एकदम पवित्रा बदलून मीहि म्हणायचो, "देवा-कडे मागण्यासारखं कांहींहि उरलं नाहीं कीं देवाची गरजहि उर-णार नाहीं त्याची कल्पनाहि शिल्लक उरणार नाहीं केवळ आपण सगळे इतके कफल्लक, लाचार, एकाकी, अगतिक म्हणून परमेश्वर सततच उरतो. भूक आहे म्हणून अन्न आहे, असं मी मानत आलों."

डॉमिनिकची मान खेदाने हलत राहायची. "च्..." तो म्हणायचा "च्...मी तुझ्यासाठीं प्रार्थना करीन."

माणूस म्हणून डॉमिनिक् अतिशय साधा, भावडा, इतरांच्या दु:खानें कासावीस होणारा, पापभीरू आणि धोपटमार्गी, भ्याड आणि प्रेमळ, असा होता.

ज्याला good Christian म्हणतात तो डॉमिनिक्; good Christian म्हटलं कीं मला डॉमिनिक् आठवतो, त्याचं कुटुंब आठवतं.

त्याचं जेवणाचं टेबल आठवतं. ""Hail Mary...." आणि "परमेश्वर माझा गुराखी" आठवतं. "अगा, आजचीच भाकर घाल आज आम्हाला...."'

मी धर्माची कधींच कास धरलेली नाहीं कारण मला अखेर फक्त माणूस–मी स्वतः दिसतोय्–माझ्या कंगाल आणि अन्नान्न अवस्था आणि माझा उत्सवी आनंद दिसतोय्. पण जर कदाचित् परमेश्वराची काठी सतत त्यांच्या पाठीला लागत असेल आणि जर कोकरांसारखी माणसं माळावरून अचूक घराकडे परतत असतील, जर पाठीवर त्या काठीची ओळख पटत असेल, तर त्यांच्या आंधळ्या आणि भावड्या आयुष्यांची माझ्या आयुष्याशीं मला कधींच तुलना करतां येणार नाहीं–ते कोणीहि असोत, किंवा मीहि.

[क्रमशः]




–वि. अ. तेंब्रे

**बोहोणीच्या रूपानें मारुती ठाकरेच्या घरीं लक्ष्मी मिरवीत आली. आणि‘लक्ष्मी’ फार झाली म्हणून बोहोणीला जखमा झेलीत घराबाहेर पडावं लागलं....**



**बोहोणी** दिग्मुढ बनली होती. तिला एकूण प्रकाराचा अर्थबोधच होत नव्हता. सर्वांवर हुकुमत गाजविणाऱ्या एखाद्या राजाला, एकदम पारडे फिरावें व लोकांनी अरेतुरे करून त्याची टिंगलटवाळी करावी व मुलांनी खडे मारूं लागावे म्हणजे त्याच्या मनाची जी अवस्था होईल तीच बोहोणीच्या मनाची अवस्था झाली होती.

प्रकार त्याहीपेक्षां भयंकर होता. तिच्या अंगावर चहू बाजूंनीं प्रहार होत होते. जाड दांडके तिच्या शरीरावर क्षणाक्षणाला कोसळत होते. पाठीवर, पोटावर, तोंडावर, पायावर, बरगड्यांवर एक सारखा मारा चालू होता. बरोबरच शिव्याशापांची पुष्पांजलि चालू होती. आहे हे कां, कशासाठीं, कारण काय, आपला अपराध कोणता हें बोहोणीला समजत नव्हतें.

प्रहार चुकविण्याचे तिचे सर्व प्रयत्न निष्फळ होत होते. तिचे शरीर रक्तबंबाळ झालें होतें. डोळा फुटला होता. रक्ताची धार त्यांतून वहात होती. अंगावरची चामडी जागोजागीं फाटली होती. एका वेदनेनें दुसरी वेदना मारून टाकली जात होती. बोहोणी थयथय नाचत होती. करुण हंबरडा फोडीत होती. बांधलेला साखळदंड तोडण्याचा वांझोटा प्रयत्न करीत होती. या प्रयत्नांत तिची मान कांचली होती.

पण प्रहार मात्र थांबले नव्हते. एकाचवेळीं अनेकांनीं तुटून पडावे असेंच या प्रहारांचें स्वरूप होते. अखेरीस तिच्या अंगांतलें त्राण संपलें, तिचा धीर खचला. एक आर्त हंबरडा फोडून तिनें धरणीवर अंग टाकलं.

“मर रांडे” असं म्हणून कुणीतरी तिच्या दुखावलेल्या डोळ्यावर वहाणेसकट लत्ताप्रहार केला. पाय झाडून तें दुःख सोसण्याचा बोहोणीनं प्रयत्न केला. तिची शुद्ध हरपली. पाय लांब पसरून ती निचेष्ट झाली.

तिला शुद्ध आली तेव्हां सर्वत्र सामसूम भासत होतं. तिनं हळूच मान उचलली, पाय आखडून घेतले. जागोजागीं झालेल्या जखमा चाळवल्या गेल्या. वेदनांची एखादी गोमच अंगावरून सरपटत जावी असें तिला वाटतें. ती कण्हली. त्याबरोबरच अंगावर आतां प्रहार होण्याचे थांबले आहेत याचीहि तिला जाणीव झाली. क्षणभर यावर तिचा विश्वास बसूं शकला नव्हता. प्रहार होत आहेत अथवा कोणत्याहि क्षणाला ते होऊं घातले आहेत असा भास तिला होत होता. पण पुष्कळ चाळवाचाळव केल्यावरहि आजू-



अनुक्रमणिका

वाजूची शांतता भंग पावली नाहीं यावरून शुद्ध हरपण्यापूर्वीचा तो अचानक उपटलेला प्रकार खरोखर थांबला आहे याबद्दल बोहोणीची खात्री पटली.

तिनें आतां आपल्या आजुबाजूला पाहण्याचा प्रयत्न केला. पण आपल्याला कांहींच दिसत नाहीं; सर्वत्र अंधारच अंधार पसरलेला आहे असें तिला जाणवलें. तिनें डोळे ताण ताणले. एक डोळा चिडचिडला आहे व दुसरा सुजलेला आहे हें आतां तिच्या लक्षांत आलें. पाय आखडते घेऊन ती सरळ वसली. आपली मान तिनें हालविली. साखळदंडाचा नेहमींचा खळखळ आवाज झाला नाहीं. सांखळदंड गळ्यावरूनहि घरंगळला नाहीं. बोहोणीच्या डोक्यांत एक कल्पना तरळली. आपला गळा मोकळा आहे. गळ्याला सांखळदंडाचें दावें नाहीं. या ठिकाणाहून कोठेहि जाण्याला आपण मोकळे आहोंत असाच त्याचा अर्थ तिला वाटला. एरवीं हा विचार तिच्या मनांतहि आला नसता पण हाडन हाड मोकळं करणारा तो मार. . .त्यानेंच या विचाराला जन्म दिला होता.

बोहोणीच्या अंगांत कुठून तरी वळ शिरल्यासारखें झाले. झडपडून ती उठली. उभी राहिली. एका डोळ्यानें तिला अगदीं अंधुक दिसत होते. गोठा सताड उघडा होता. रिकामा होता. बोहोणी जागेवरच आपल्या अंगाभोवती फिरली. दाव्याचा अडथळा तिला जाणवला नाहीं. आपल्या गळ्यांत खरोखरच सांखळदंड नाहीं याबद्दल तिचें मन तिला खात्री देत होतें. त्वरेनें ही जागा सोडून जायला हवें असें कोणीतरी ओरडून ओरडून आपल्याला बजावीत आहे, वेळ लावूं नको म्हणून सांगत आहे असं प्रकर्षानें आतां तिला भासूं लागले.

"होय होय मलाहि असंच वाटतं. निघालेच मी." बोहोणी रेकली आणि धूम ठोकून तिनें गोठा सोडला. अंग दुखत होतें, पाय लचकत होता. आपलें अजस्त्र धूड मार खाल्लेल्या पायांना पेलवत नव्हते तरीहि बोहोणी पळतच होती. पाय नेतील तिकडे जात होती.

☆ ☆ ☆

**रणरणत्या** उन्हांत सौदा चालला होता.

बोहोणीला अजून तिचें बोहोणी नांव मिळालेलें नव्हतें.

जंगल्या दोशी आणि त्याच्याबरोबर असेच आलेले त्याचे इतर गांवकरी बोहोणीचा सौदा पटवीत होते.

मारुती ठाकरेला बोहोणी पसंत पडली होती. त्याला दुधाचा धंदा करायचा होता. गांवांत दुधाला चांगली मागणी होती. मारुतीजवळ वखळ जागा होती. भाजीपाल्याच्या धंद्यांत त्यानें दोन पैसे कनवटीला लावले होते. बायकोहि विड्या वळून संसाराला हातभार लावीत होती. पण भाजीपाल्याचा धंदा अस्थिर आणि विडी वळण्याच्या व्यवसायांत कष्ट फार व प्राप्ती जेमतेम म्हणून मारुतीनें दूधदुभत्याच्या धंद्यांत पडायचे ठरविले होते.

कोरीकरकरीत म्होसकी बोहोणीच्या जवड्यावर होती व तिला कोरा करकरीत कासरा बांधलेला होता. कासऱ्याचें दुसरें टोंक बोहोणीच्या काळ्या कुळकुळीत पाठीवरून पलिकडे लोंबत होते. पेंढा भरलेले एक रेडकूं जमिनीवर उभें केलेले होते आणि तेंच आपलें अपत्य समजून बोहोणी त्याच्याजवळ उभी होती, मधूनच त्याला चाटीत होती आणि समाधानानं रेकत होती.

"हे पहा जंगल्या" मारुती बाजार फिरून पुन्हां जंगल्याकडे आला होता. "आतां अखेरचं सांगतो. तीनशें रुपयाला देऊन टाक जनावर वास यापुढें आपली हिंमत चालत नाहीं. आन तुलाबी कोणी इतकी किंमत मोजायला राजी होणार नाहीं." त्यानें मागणी वाढविली.

"नाहीं पाणी तुटायचं दादा" जंगल्या हावभाव करीत उत्तरला. गिऱ्हाईक जनावरावर लट्टू झालेले त्याने ओळखले होते. तोंड मागीतलं मोल अशांच गिऱ्हाईक देत असते हें त्याला अनुभवानें माहित झालेले होते. त्याचा हा नेहमींचाच व्यवसाय होता. म्हशींना चांगली मागणी होती व गिऱ्हईकांनाहि तोटा नव्हता. बाजारभावाप्रमाणें माल काय कोणीहि घ्यायला तयार झाले असते. त्यापेक्षां अधिक किंमत देणारा भेटला तर त्याच्यासाठीं वाट पाहायची जंगल्याची तयारी होती.

बोहोणीचे जंगल्याला पांचशें रुपये हवे होते. पण इतके रुपये कोणी मोजणार नाहीं हेहि तो जाणून होता. जेमतेम तीनशें साडेतीनशेंपर्यंत तिचा सौदा होण्याची त्याची मनोमन अपेक्षा होता. त्या पातळीपर्यंत बोली चढली होती. आणखी थोडे ताणून धरण्यानें कदाचित् पाचपंचवीस रुपयांनीं बोली चढण्याचा संभव होता.

"मर्जी तुझी" आपल्याला जणूं मोठी निकड नाहीं असें भासविण्याचा प्रयत्न करीत मारुती ठाकरे उद्गारला. "पण मीं रुपये कांहीं कमी बोललो नाहीं. कांहो पाहुणे !" शेजारींच उभ्या असलेल्या एका वघ्याला उद्देशून मारुती म्हणाला. "तीनशें रुपये या जनावराचे कोण देईल ?"

"न कां देईनां ! आपला घरीं गोरस खाल्ला." जंगल्या म्हणाला. आपल्यालाहि गिऱ्हाईकांची तशी जरुरी नाहीं हें त्याला भासवायचे होते.

मारुतीला वाटलें आतां इथें थांबण्यांत अर्थ नाहीं. अधिक बोली चढविण्याचीहि त्याची इच्छा नव्हती. जास्त थांबण्यानें सौदा पटण्यापेक्षां जंगल्याचा लोभच वाढणार हें त्याला स्पष्ट दिसत होतें. आपल्या परीनें त्यानें किंमत खरोखरच जास्तीत जास्त वाढविली होती. इतरांनीं तिची किंमत अडीचशें पेक्षां अधिक वाढविली असती कीं, नाहीं याची शंकाच होती. तेव्हां घरींच दूध खाण्याची भाषा जेव्हां जंगल्या बोलूं लागला तेव्हां मारुतीला राग येणें साहजिकच होते. आज महिना झाला तो म्हशीच्या शोधांत होता. खरेदीसाठी मध्यस्थाचा उपयोग करण्याचा त्यानें प्रारंभी प्रयत्न केला. पण त्यांत त्याला फसवणुकीचाच प्रकार जास्त दिसला. चहापाण्यावारीच त्याच्या पैशाचा खुर्दा होऊं लागला. म्हशींचे मालक संशयास्पद वाटले आणि सौदेहि होतांना संशयास्पद नेत्रपल्लवी, करपल्लवीचे प्रयोग त्याला दिसून आले. तेव्हां तो नाद सोडून तो स्वतःच सौदा पटविण्यासाठीं बाहेर पडला होता. म्हशीच्या बाजाराची रीत आणि बोली आतां त्याच्या चांगल्या परिचयाची झाली होती.

गिऱ्हाईक बिथरतं आहे हें जंगल्यानें तावडतोब हेरलं. मारुती पुढें चालूं लागणार तोंच उकीडवा बसलेला जंगल्या उठून








**"महाराष्ट्र जिवंत असेल तर...."**

**शिक्षेचे पहिले कांहीं दिवस बाबाराव सावरकर यांना डोंगरीत ठेवले होते. २४ जूनला 'देशाचें दुर्दैव' ह्या लेखाबद्दल लो. टिळक यांना पकडण्यांत आले. त्यांच्यावरील खटल्याचें काम मुंबईंत चालावयाचे होते. २५ ला त्यांना डोंगरी तुरुंगांत आणण्यांत आले. त्यावेळीं बाबाराव पहिल्या कोठडींत होते. लोकमान्यांना आपल्या कोठडी समोरून नेतांना त्यांनीं पाहिलें. दुसऱ्या दिवशीं सारे कैदी एकत्र येतांच बाबारावांनीं लोकमान्यांशी बोलण्याची संधि साधली. ते म्हणाले, "बळवंतराव आपण कारागृहांत आलांत. आतां महाराष्ट्राचे कसें होणार?" त्यावर लोकमान्य म्हणाले, "बाबा, महाराष्ट्राची काळजी करूं नकोस. महाराष्ट्र जिवंत असेल तर एक माणूस कमी झाल्यानें तो कांहीं मरणार नाहीं. आणि मेलेलाच असेल तर एका माणसानें कांहीं जिवंत व्हावयाचा नाहीं. मग चिंता कां?" लोकमान्यांची आणि बाबांची ती शेवटची भेट, पण त्यांचे हें उत्तर बाबांच्या मनांत मात्र शेवटपर्यंत कोरलेलें होतें.**

उभा राहिला. बोहोणीच्या पाठीवरचा कासरा हातांत घेऊन त्याने मारुतीला हांक घालून परत फिरवले.

"मालक" तो म्हणाला, "गोरसाची आन आहे. तीनशें रुपयाला ही दोवड मला घरांत पडलेली आहे. पोटापाण्याला कांहीं द्या आन हा कासरा ताव्यांत घ्या."

जंगल्या अगदीं अजिजीनें आणि आपला प्रत्येक शब्द खरा आहे असें भासवीत बोलत होता. पण त्याचा प्रत्येक शब्द खोटा होता. बोहोणी त्याला अगदीं स्वस्तांत पडलेली होती. पहिल्या वेतानंतर ती आटली व पारोठी झाली तेव्हां पावसानं डोळे वटारले होते. वैरणीचा तुटवडा निर्माण झाला होता. जनावर पोसणें कठीण होऊन बसले होते. बोहोणीचा मालक सज्जन होता. एक भला माणूस पाहून त्यानें बोहोणी त्याला फुकट देऊन टाकली होती. पण तो भला माणूस वरवरच भला निघाला होता. बोहोणीला त्यानें बाजार दाखवून खाटकाला विकण्याचा घाट घातला होता. जंगल्याला बाजारांत हा प्रकार दिसला. जनावर जातीवंत आणि तरुण असल्याचें त्याने हेरले होते. खाटकापेक्षां दहा रुपये जास्त देऊन ऐशीं रुपयांत त्यानें बोहोणीचा सौदा पटविला होता.

नाहीं पाणी तुटायचें असें जरी जंगल्या म्हणाला असला तरी त्याची दमछाट झाली आहे हे मारुतीच्या लक्षांत यायला उशीर लागला नाहीं. आपली चाल त्यानें थांबविली नाहीं. चालताना मागे वळून तो हातवारे करीत म्हणाला.

"तीनशेंपेक्षां एक तांबडा शिवराई जास्त देणार नाहीं. बोल! करतोस का सौदा? तर फिरतो माघारी." मारुतीनें पुढें सरकण्याचा आव आणला.

"मालक असं पोटावर मारूं नका." जंगल्या अधिकच लाचारी दाखवीत बोलूं लागला. चढेल केव्हां व्हावें आणि लाचारी केव्हां दाखवावी या कलेंत तो अनुभवानें पारंगत झाला होता. "हे पहा तुमचं राहूं द्या नि माझं वि राहूं द्या. सव्वातीनशें द्या नि आपलं जनावर आपल्या ताव्यांत घ्या." कासरा त्याने पुढें केला.

आणि हो ना करता तीनशें-पंधरा रुपयांवर सौदा जमला. चहा पाण्याचा कार्यक्रम झाला आणि बोहोणी मारुतीच्या गोठ्यांत येऊन दाखल झाली.

☆ ☆ ☆

**बोहोणी** शकुनाची ठरली होती. तिला दूध भरपूर सुटले होते. भाजीपाल्याच्या एका सौद्यांत मारुतीला एक चांगलाच लग्गा साधला होता. त्याच्या गोठ्यांत एका मागून एक म्हशी दाखल होऊं लागल्या. पाण्यासारखा पैसा घरांत येत होता. गडावरच्या भवानी देवीसारखी त्याची बायको चितांग पुतळ्याची माळ, गळोसरी अशा भरगच्च सोन्याच्या दागिन्यांनीं फुलून निघत होती. मारुती एक आसामी होऊन बसला होता.

बोहोणीची म्हैस शकुनवती ठरली म्हणून तिचें बोहोणी नांव मारुतीच्या घरांत रूढ झालें. बोहोणी घरातलें एक माणूसच बनली होती. तिची खास ठेप ठेवण्यांत येत असे. इतर जनावरांना कमी करूनहि बोहोणीला चांगलेचुंगले खायला घातले जात असे. ती आटल्यावरहि तिच्या वडदास्तींत उणेपणा केला जात नसे. बोहोणी मारुतीच्या गोठ्यांतली एक लाडकी म्हैस बनली होती आणि साऱ्या गल्लीला आणि म्हशींचा व्यवहार करणारांना ही गोष्ट माहित झाली होती. बोहोणीलाहि ही लाडकी वागणूक आपला हक्क वाटूं लागला होता. आणि तिचा हा हक्क कोणी नाकारीतहि नव्हते.

बोहोणीची वेतामागून वेतें झाली होती. आतां तिचे वय वाढले होते. मारुतीचाहि पसारा वाढता होता. तो आतां पूर्वीचा राहिला नव्हता. त्याला व्यसनांची चटक लागली होती. गोठ्याची कामें पूर्वी तो स्वतः करायचा. पण आतां या कामावर गडी माणसें आलेली होती. आणि गड्यामाणसांची कामें गड्यामाणसांसारखीच होत होती.

...त्या दिवसाची गोष्ट.

—मारुती चिक्कार पिवून आला होता.

म्हशी पिळायची वेळ झाली होती. पण धार काढणारे दोन गडी बेपत्ता झाले होते. ते केव्हां येतील याचा नेम नव्हता. दाणा घालण्याची आणि धार काढण्याची वेळ जशी टळायला आली तशा म्हशी गोठ्यांत अस्वस्थ झाल्या. एक गडी आला. पण एकाच्यानें काम भागणें शक्य नव्हते. मारुतीनें नोकरांना खूप शिव्या मोजल्या. आदळ आपट केली. आणि मग तो स्वतःच धार काढायला पुढें सरसावला. बायको नको नको म्हणत असतांना त्याने हाताला लागली ती चरवी उचलली आणि बोहोणीखाली तो जाऊन बसला.






अगोदरच उशीर झाला होता. शिवाय नेहमीप्रमाणें दाण्याचे घमेले बोहोणीपुढें ठेवण्यांत आले नव्हते. सडाला पेंढा भरलेले रेडकू लावले नव्हते. हा सर्वच प्रकार तिला चमत्कारिक वाटला. ती एका जागीं स्थिर उभी राहीना. सारखी हालचाल करूं लागली.

"च्या मायची दोबड म्या" मारुतीनें शिवी हांसडली. एक रट्टा त्यानें तिच्या पोटावर ठेवून दिला. बोहोणी वियरली. तिचे लक्ष दाण्यावर होते. दाणा तिच्यापुढें अजून ठेवण्यांत आलेला नव्हता. ती पुढें सरकली. उकीडवा बसलेल्या आणि दारु प्यात्यानें तर्र झालेल्या मारुतीला हा धक्का पुरेसा होता. गिरकी घेऊन तो कोलमडला तो नेमका बोहोणीच्या मागच्या दोन पायांत.

आपल्या पायांत कांहींतरी अडकले आहे इतकीच बोहोणीला जाणीव झाली. ती नाचूं लागली. तिचा सारा भार मारुतीच्या छातीवर, तोंडावर पडूं लागला. खूर त्याच्या अंगावरून घसरूं लागले. मारुती ओरडूं लागला. मेलो मेलो म्हणूं लागला. कांहीं क्षणांतच त्याची शुद्ध हरपली. मदतीसाठीं मुलगा, बायको, गडी धांवले. पण फार उशीर झाला होता.

क्षणापूर्वी भरलेले मारुतीचे घर आक्रोशानें दणाणून गेले. गल्ली जमा झाली. काय झाले, कसे झाले याची माहिती नवागत विचारूं लागले व अगोदर आलेले ही माहिती सरभरीत रीतीनें त्यांन ऐकवूं लागले. बोहोणीनें मारुतीला तुडविला ही वार्ता आगीसारखी गल्लीभर पसरली.

–मारुतीच्या मुलाचा तोल सुटला.

–हातांत एक दांडकें घेऊन त्यानें भवानीला झोडपायला प्रारंभ केला.

–आपल्याला फुलासारखे जपणारे लोक एकदम आपल्यावर तुटून कां पडावेत व त्यांनीं मरेमरेतो आपल्याला का झोडपावें हे बोहोणीला जरी समजण्याच्या पलिकडचे असले तरी त्याचे कारण हें असे होते.

***

बाहेरच्या गार वाऱ्याच्या झुळुकीनें बोहोणीला हुशारल्या-सारखे वाटले. लंगडत धडपडत ती अंदाजानें चालली होती. आपण कुठें जाणार हें तिला समजत नव्हते. पण आपल्याला या धरणीवर आसरा उरला नाहीं असें मात्र तिला वाटत होते. घरापासून दूर जाण्याची तिला संवय नव्हती. सारखी ती वळून पहात होती. परत फिरण्याचा तिला मोह होत होता. पण परत फिरूं नये असें कुठल्या तरी अज्ञात ज्ञानेंद्रियाच्या प्रेरणेनें तिला वाटत होते.

आपण किती चाललो याचा बोहोणीला अंदाज येत नव्हता. तिला समोरचे फारच थोडे दिसूं शकत होते. आपण खूप खूप थकून गेलो आहोंत असें मात्र तिला वाटत होते. तोंडाला कोरड सुटल्यासारखी झाली होती. सड ताठून गेले होते व त्यांतून दूध ठिपकूं लागले होते. बोहोणीला वाटले आतां कुठेंतरी थांबावे. खालीं बसकण घ्यावी.

चालता चालता तिचा पाय एका खड्यांत पडला. तिचा तोल ती सांभाळू शकली नाहीं. एखादी भिंत एकदम कोसळावी तशी बोहोणी खालीं कोसळली. तिच्या अंगावरच्या जखमांवर खडे, गोटे रुतले आणि वेदनांच्या असंख्य विंचवांनीं तिला एकाच वेळीं दंश केला. ती करुण स्वरांत रेकली. तिचे पाय झाडले गेले. उठण्याचा तिनें निष्फळ प्रयत्न केला.

–त्याच वेळीं.

–मारुतीला दवाखान्यांत नेण्यांत आलें होतें. पाण्यासारखा पैसा खर्च करून त्याच्यावर उपचार चालू होते. त्याच्या जखमा बांधण्यांत आल्या होत्या. तुटलेल्या फासळ्या नीट बसविण्यांत येत होत्या. त्याची बायको क्षणाक्षणाला डॉक्टरांना विनवीत होती.

"डॉक्टर सायब पैशाकडं पाहूं नका. पण मालकांना बरं करा.

–आणि

–बोहोणी दूर नदीकाठीं निपचित पडली होती. पाय झाड-ण्याचेहि त्राण तिच्यांत उरले नव्हते. ती मधुर स्वप्नें पहात होती. आपला मालक आपल्याला शोधीत आला आहे. आपली पाठ त्यानें थोपटली आहे. "यायवं दोबड म्या"- असे कधीं रागाचे कधीं कौतुकाचे उद्‌गार तो काढीत आहे. दाण्याची पाटी आपल्याकडे ठेविली जात आहे. आपण अधाशाप्रमाणें दाणा खात आहोंत आणि सडाला कुणाचे तरी हात लागत आहेत . . .

–पण ती स्वप्नेंच होती.

–तिच्या पाठीवर कावळे नाचत होते.

–आणि सडांना मुंगी लागली होती.

●●●




लेखक : चार्ल्स शॉ

**अनुवादक — प्र. श्री. नेरुरकर**

[९]

**भूक**

**त्या** रात्रीं उशीरा, शिबिराभोंवतीं शत्रूनें रक्षक नेमून तो झोपी गेला असेल असं मानून ॲलिसन आपल्या खड्डयांतून वाहेर पडला आणि सिस्टर अँजेलाचे वाडगे घेऊन खाली त्या छोटया नदीकडे गेला. पाण्यानें पूर्ण भरलेला एक एक वाडगा प्रत्येक हातांत घेऊन व काळजीपूर्वक चालत तो परत आला तेव्हां त्याला ती आपल्या खड्डयाबाहेर आलेली आढळली.

कृतज्ञतापूर्वक तिनें घोट घेतले आणि म्हणाली, "बाहेर येण्यांत मी चूक केली. परन्तु तूं फार काळ दूर असल्यासारखं वाटलं, आणि तिथें अंत राहाणं केवळ मला शक्य नव्हतं. कृपया दुसऱ्या वेळीं मी तुझ्यावरोबर येऊं काय ?"

ह्या प्रश्नाविरुद्ध त्याला तर्कबुद्धि लढविणं शक्य वाटलें नाहीं व तसें त्यानें बोलूनही दाखविलें.

"पुष्कळसं पाणी पिऊं नकोस," तो पुढें बोलला, "उद्यां रात्रीपर्यंत आणखी अधिक मिळण्याची शक्यता आम्हांला दिसत नाहीं. आणि आतां आपल्याला झोपलं पाहिजे."

"होय." तिनें संमति दिली. ज्यांतून ती पाणी प्याली होती तो वाडगा तिनें घेतला आणि एखाद्या लहान मुलाप्रमाणें मूकपणें आज्ञापालन करीत ती आपल्या खड्डयांत अदृश्य झाली. कांहीं वेळ ॲलिसन एकटाच ऐकत उभा राहिला. मग त्यानें आपला वाडगा घेतला व आपल्या खड्डयांत तो खालीं उतरला. जरी

**पूर्व कथासूत्र**

**हेन्री ॲलिसन व सिस्टर अँजेला हीं दोन माणसें तिथें स्वतःसाठीं दोन विवरें तयार करतात. एकमेकांच्या सहवासांत आजचे आणि उद्यांचे विचार करीत राहतात. हा पुरुष होता—नाहीं म्हटलं तरी त्याच्या मनांत 'अँजेला'-मधील 'स्त्री'संबंधीं विचार करूं लागलं. तेवढयांत कांहीं बोटी समुद्रांत दिसल्या. जपानी आले आहेत ह्या विचारानें तीं दोघें लपतात. ॲलिसन आपल्या विवराला सुरीनें भोंक पाडतो. आणि त्यांतून तीं दोघें बोलूं लागतात...**

त्याचं मन तरतरीत होतं, तरी त्याचं शरीर विलक्षण श्रांत झालं होतं. त्यानें झोपेचा विचार केला नाहीं, पण बहुधा एकदम तो झोपी गेला. तो उठला तेव्हां दिवसाचा प्रकाश जमिनीतील आपल्या विवरांत वारीकसा प्रकाशत आहे हें, पाहून त्याला आश्चर्य वाटलं.

त्या दिवशीं, दुपारी मध्यावर पांच सशस्त्र जपानी सैनिक त्यांच्या खड्डयापासून फार दूर अंतर न ठेवतां चालत गेले. आपल्या प्रवेशद्वाराच्या वेलींतून, त्यांना सावकाश चालतांना एकत्र बोलतांना व हंसताना, ॲलिसननें न्याहाळलं. मग ते दृष्टिआड निघून गेले. ॲलिसननें वाट पाहिली. त्या खड्डयांच्या भोंवतालची इंच न् इंच जागा त्याच्या डोळयांनीं धुंडाळली, परंतु ऐकण्यासारखं किंवा पहाण्यासारखं तिथें कांहींच नव्हतं. त्यानें व सिस्टर अँजेलानें जें कांहीं घडलं यावर विचारविनिमय केला आणि मग तो नौ–सैनिक आपल्या टेहेळणीच्या ठिकाणीं परतला.

नंतर काळोख आला आणि त्यानें पक्षांना शांत केलं. रात्रिचर हालचाल करूं लागले आणि रानांत ओरडूं लागले. ॲलिसननें आणि जोगीणीनें त्या छोटया नदीपर्यंत एक मंद व दक्षतापूर्ण अशी सहल केली आणि कुजबुजत त्यानी आपले वाडगे भरले. मग रात्रीसाठीं ते आपल्या खड्डयांकडे वळले.

ॲलिसन खाली पडून राहिला आणि वेटावर आल्यापासून प्रथमच त्याला भुकेची जाणीव झाली. त्यानें प्यालेलं पाणी त्याच्या पोटांत विचित्र आवाज करीत होतं. ते आवाज ऐकतां ऐकतां तो अकस्मात झोपीं गेला. पुनः तो उठला तेव्हां दिवस उजाडला होता.

तो सबंध दिवस त्यानीं जपान्यांना पाहिलं नाहीं कीं, ऐकलं नाहीं. याबद्दल सिस्टर अँजेलाला उत्सुकता लागून राहिली होती. ते दूर निघून तर गेले नसतील ना, याचं तिला नवल वाटलं.

"यावर तूं विश्वास ठेवूं नकोस;" ॲलिसन म्हणाला, "माझा असा तर्क आहे कीं, त्यांनी सभोंवार पाहिलं, त्यांना कांहीं आढळलं नाहीं. आणि या वेटावर लोक नाहींत असा त्यांनीं निर्णय घेतला. बहुधा त्या ठाण्यावरील आपल्या शिबिरांत ते माघारे परतले असावेत. परंतु ते दूर निघून गेले आहेत असं समजण्याची भूल करूं नकोस."










नंतर टेकडीखालीं जाऊन जपानी लोक काय करीत आहेत हें पाहण्याची आपली इच्छा त्यानें तिला सांगितली. ती भयंकर म्याली व त्या कल्पनेला तिनें विरोध केला; त्याचं एक कारण असं होतं कीं, त्याची तिला भीति वाटली आणि दुसरं म्हणजे तिला एकटं राहण्याची इच्छा नव्हती. तिच्या विरोधाकडे ॲलिसननें लक्ष दिलं नाहीं. तिकडे खालीं काय घडत असेल हेंआपण जाणून घेतलंच पाहिजे असं त्याला वाटलं. त्या जोगीणीने त्याच्या योजने विरुद्ध युक्तिवाद चालू ठेवला तेव्हां तिला आपल्या खड्ड्यांत जाण्याची आणि तो परत येईपर्यंत तिथेंच राहण्याचा त्याने हुकूम केला. तिने त्याच्याकडे चिंतातुरतेने पाहिलं, मग मूकपणें ती वळली आणि तिनें आज्ञा पाळली.

जंगलांतील रात्रीच्या वेळीं ज्या कांहीं विविध आरोळ्या, ओरडणं ऐकूं येणं शक्य होतं तें ऐकत, तो जंगलांतून लक्षपूर्वक चालला होता. कोणताहि मानवी आवाज ऐकण्याची त्याच्या कानांची तयारी होती. कोणताहि मानवी गंध घेण्याची त्याच्या नाकाची तयारी होती. जंगलांत हळुवारपणें कसं चालावं हें तो शिकला होता. आणि एखाद्या शिकारी जनावरांप्रमाणें रात्रीची तो हालचाल करीत होता. त्याची प्रत्येक जाणीव धोक्यांतून पार पडण्याची तयारी ठेवीत होती.

शत्रूच्या शिबिराजवळ तो आला तेव्हां तो आणखी अधिक काळजी घेऊं लागला. त्यानें आपल्या देहाचं वजन खाली आपल्या पावलावर टाकण्यापूर्वी त्याच्या प्रत्येक पावलाला त्याची जाणीव होत होती. शेवटीं एकदाचा तो त्या जंगलाच्या टोकाला जाऊन पोंचला आणि त्यानें त्या शिबिराकडे पाहिलं. तेथें प्रकाश होता. निळा प्रकाश, अंशतः शत्रू विमानांपासून लपण्यासाठीं आच्छादन घालणारा! लवकरच त्या तरीवर त्याला जहाजाचा काळा आकार तो पाहूं शकला आणि त्या जहाजावर व तरीवर निळा प्रकाश होता आणि हालणाऱ्या छाया दिसत होत्या. दूरवर त्याला आवाज ऐकूं आले आणि एकदां तर त्याने एक हास्य ऐकलं.

तेथें रक्षक नाहींत असें पाहून, जपानी लोकांच्या शिबिराच्या एका टोंकाच्या बाजूकडे तो खाली पोट टेकून पडून राहिला. बेटाच्या दुसऱ्या किनाऱ्यावर त्यांनीं पहारेकरी ठेवूं नयेत हें किती विचित्र, असा विचार त्याच्या मनांत आला. युद्धकाळांत लष्करी सैन्यानें इतकं निष्काळजी राहावं हें नेहमीचं नव्हतं, जितकं—त्याच्या विचाराना त्या उपसागरांतील युद्धनौकेच्या भोंग्याच्या आवाजानें खिळ घातली. तरीवर असलेल्या जहाजांतून एक लहानशी शीळ आली. एक दिवा सोडून, तरीवरील सर्व दिवे मालवले. मग त्या युद्धनौकेची काळी आकृति किनाऱ्याकडे येताना त्याने पाहिली. तें जहाज थांबल्यासारखं वाटलं; मग त्याच्या लक्षांत आलं कीं, तें जहाज वळलं होतं. दूरवर कांहींसा आरडाओरडा होत होता, मग तीं दोन्हीं प्रचंड जहाजे समुद्राकडे चालू लागली.

त्याचं हृदय अनावरपणें उचंबळून आलं; जपानी लोक तें बेट सोडून जात आहेत अशी क्षणभर त्याने कल्पना केली. पण तत्काळ त्याचा आनंद ओसरला, कारण शिबिराकडून त्याला बोलण्याचे आवाज ऐकू आले. तथापि त्या जहाजांच्या जाण्यानें त्याला बरं वाटलं. तीं जहाजें परत येईपर्यंत, त्या शिबिरांत फक्त एक छोटं सैन्यवळ राहणार होतं.

कांहीं काळ ॲलिसनने लक्षपूर्वक पाहिलं आणि ऐकलं, परंतु शिबिराकडून पुनः आणखी गलबला ऐकूं आला नाहीं. लवकरच त्या काळोखांतून फक्त दोन दिवे क्षीणपणें दिसूं लागले, आणि ॲलिसन पुनः जंगलाकडे परतला.

टेकडीच्या माथ्यावर परतल्यावर, सिस्टर अँजेलाच्या खड्ड्यासमोर ॲलिसन उभा राहिला आणि त्याने तिला हांक मारली. सुटकेच्या आनंदी स्वरांत तिने 'ओ' दिला कीं ज्यामुळें प्रसन्नतेची ऊब त्याच्या हृदयाला जाणवली. तिने त्याला आपण कुणाला तरी हवा आहे अशी नवी व प्रबळ संवेदना प्राप्त करून दिली. प्रदीर्घ व कष्टदायक श्रम करून घरीं परतणाऱ्या माणसाप्रमाणे त्याला वाटलं—आपलं मनःपूर्ण स्वागत झाल्यासारखं. स्वतःच्या या भावनेचा त्याला नीट बोध झाला नाही आणि त्याने ती शब्दांतून व्यक्त केली नाही, परंतु तिच्यांतील आनंदाची त्याला जाणीव झाली.

त्या शिबिरांत त्याने काय पाहिलं होतं तें तिला सांगून, तो म्हणाला, "जहाजांनीं किनारा सोडला आहे. प्रथम मला वाटलं ती सर्व निघून जात आहेत. परंतु तसं नव्हतं. त्या शिबिरांत आतां फक्त पुरुष तेवढे आहेत. जहाजांनी प्रयाण केलं आहे."

"तीं जहाजें निघून गेलीत?" तिने आश्चर्यानें तोच प्रश्न विचारला.

"होय! परंतु त्या तिथें खाली अजून पुरुष आहेत. ते केवळ मूठभर असतील अशी मी आशा धरून आहे. कदाचित् हें बेट महत्त्वाचं नसेल. कदाचित् प्रथम त्यांना तसं वाटलं असेल आणि मग त्यांच्या मनांत बदल घडून आला असेल. कदाचित् जे अजून





अनुक्रमणिका

इथे आहेत ते त्या शिविराजवळ राहतील. तसे ते राहतील, तर कदाचित् आपण दिवसा कांहीं शिकार करूं शकूं."

"किती चांगलं होईल तें," कुणीतरी आपल्याला चहाला बोलावलं आहे अशी समज झालेल्या आवाजांत ती म्हणाली, "कांहींतरी भक्षणार्थ मिळेल तर चांगलं होईल. आतापर्यन्त त्याचा विचार करण्याची मला कितीतरी काळजी वाटत होती. मला भूक लागली आहे."

"त्याबद्दल बोलणं आपण टाकूंया," तो म्हणाला, "तुझ्या पाण्याची अवस्था कशी आहे ?"

"माझ्याजवळ भरपूर आहे. मिस्टर ॲलिसन, तूं आतां विश्रांती घेणं बरं नाहीं काय ?"

"बरोबर. खाली तिकडे काय घडतं हें पाहण्यासाठी मी दिवसा-उजेडी त्या शिबिराकडे जाणार आहे. पहांटेपूर्वी किंचित् लवकर तूं उठलीस तर मला हांक मार. गुड नाइट, सिस्टर."

संध्याकाळच्या चित्तथरारक घडामोडीनंतर दमल्यासारखं वाटून तो आपल्या खड्ड्याकडे गेला. क्षणभर भुकेने तो पीडला गेला, पण लवकरच झोपी गेला.

प्रभात झाली तेव्हां, जपान्यांच्या शिबिरांच्या वर जंगलाच्या एका टोकाला ॲलिसन खाली पडून राहिला होता. जहाजांविना उपसागर रिकामा होता. अकस्मात त्याने एक रक्षक पाहिला. जमिनीवर सुमारे वीस फूट उंचीवर ओबडधोबडपणे बांधलेल्या एक प्रकारच्या माच्यावर तो उभा होता. ॲलिसनपासून तो सुमारे तीनशें यार्डांवर होता. परंतु पहांटेच्या स्वच्छ प्रकाशांत ॲलिसनने त्याचा गणवेश आणि रक्षकाच्या जवळच्या खांबावर लटकणारी त्याची बंदुक सहजपणे पाहिली. त्या रक्षकाची शरीरयष्टि ठेंगणी आणि चौफेर भरदार अशी होती. त्याने आळोखे पिळोखे दिले, सिगारेट पेटविली आणि उघडच समुद्राकडे तो पहात ॲलिसनकडून दूर वळला.

लवकरच त्या शिबिरांत हालचाल सुरू झाली. माणसें घाईघाईने इकडेतिकडे फिरू लागली. अन्न शिजविणाऱ्या आगींतून धूर निघूं लागला. एक शिटी वाजली, आणि दोन किंवा तीन अधिकारी दिसूं लागले. इकडेतिकडे कांहीं धांवपळ झाली आणि पुकारलेले शब्द त्या रक्षकापर्यंत आले. एक सैनिक त्या माचावर चढला आणि त्या रक्षकाची त्याने जागा घेतली. तो रक्षक खाली आपल्या सैनिक बांधवांत सामील झाला—ॲलिसनने वीस माणसे मोजली—आणि ती सर्व त्या बंगल्यांत गेली. ते आपली सकाळची न्याहारी करीत होते हें ॲलिसनने ओळखलं आणि स्वतःची भूक जाणवून तो स्वतःलाच दोष देऊं लागला.

खड्ड्यांकडे घाईने परतून तो सिस्टर ॲंजेलाला म्हणाला, "ते खात आहेत. तें त्यांचं उरकेपर्यंत मी शिकारीसाठीं जाणार आहे. मी फार वेळ राहणार नाहीं."

"तूं काळजी घेशीलच !" ती ओरडली, पण त्या छोट्या नदीकडे धांवत घाईनें जात असतां त्यानें तिचे शब्द ऐकले नाहींत. नंतर पुष्कळ तासांनीं तो परत आला. आपल्या खड्ड्यांत त्यानें त्यांच्या दोन विवरांतील मधल्या उघड्या जागेजवळ तिला बोलावलं.

"हं, हे घे," रागानें घोगरा झालेल्या आवाजांत तो म्हणाला, "हे गोड बटाटे आहेत. त्या नदीजवळ तिकडे खाली जिथें रानटी डुकरें अन्न खात होती तिथें हे मला मिळाले. यापुढें आपली आग कांहीं पेटणार नाहीं. त्यामुळें असं काय घडणार आहे ? कांहीं झाले तरी शिजविण्यासारखं इथें कांहीं नाहीं. तूं ते बटाटे खाऊ शकतेस. ते बहुधा पाण्यासारखें आहेत." खोल विचारांत गढून तो थांबला. मग पुढे म्हणाला, "कदाचित आपण आतां आशा सोडून देऊं. या ना त्या मार्गाने अन्नाविना आपण मरून जाऊ. मी सर्वत्र शोध केला. फळें नाहींत, पक्षी नाहींत, कांहीं नाहीं, फक्त बटाटे. माणूस बटाट्यावर जगूं शकत नाही. सिस्टर खा ते. ते खा. कदाचित् ते तुझं पोट भरतील—किंवा तुझा प्राण घेतील." त्याचा आवाज भसाडा झाला आणि विनोदशून्य असं रानटी हंसूं तो हंसूं लागला.

आपल्या खड्ड्यांतील अर्धकाळोखांत सिस्टर ॲंजेलाने, एका बटाट्यावरची माती पुसून टाकली व त्याला ढास मारली. तिने ॲलिसनचं बोलणं ऐकलं पण त्याला काय उत्तर द्यावं हें तिला समजेना. त्याच्या विचित्र हास्यानं तिच्या उरांत धडकी भरली होती.

शेवटीं, शांतसा होत, तो हसायचा थांबला आणि त्या दोघांत स्तब्धता नांदली. प्रत्येकाच्या डोक्यांत आपले भुकेचे आणि निराशेचे विचार घोळत होते. त्या जोगीणीने तो मातट बटाटा खाल्ला आणि भीतीने ती नीरवतेला कान देत राहिली. ॲलिसन बोलला, तेव्हां तो पुनः माणसांत आल्यासारखा वाटला आणि सुटकेच्या भावनेने ती निमूटपणे रडूं लागली.

"सिस्टर, मला वाटतं मी क्षणभर झोप घ्यावी. तूं तुझे डोळे उघडे ठेव आणि टेहळणी कर."

"बरं." ती म्हणाली. बोलण्यासारखं तेवढंच काय तें ती बोलूं शकली.

दुसरा दिवस उजाडला आणि जपान्यांच्या शिबिरांत निरीक्षण करीत ॲलिसन पुनः पडून राहिला. पूर्वीप्रमाणेच रक्षकांत झालेला बदल. आणि आपल्या सकाळच्या न्याहारीसाठी त्या सैनिकांचं बंगल्यांकडे जाणं, त्यानं पाहिलं. ते दिवसभर काय करतात हें पाहण्याच्या उत्सुकतेने तो ह्यावेळीं तिथेंच राहिला. त्याला जहाजें दिसत नव्हती.

निरीक्षण करतां करतां तो त्या रक्षकाविषयी विचार करूं लागला. तेथें तो तेवढाच एक होता काय ? त्याच्या डोळ्यांनी तें शिबिर, ती तर, आणि शिबिराभोंवतालचं जंगल धुंडाळलं. जवळपास दुसरा एखादा रक्षक नसावा असं वाटत होतं.

पहांट झाल्यापासून ॲलिसन तेथें होता आणि त्या शिबिरांत कुणी आलं नव्हतं किंवा तिथून बाहेर गेलं नव्हतं याची त्याला खात्री वाटत होती. त्या माच्यावरचा मनुष्य हाच एकमेव रक्षक होता. हें सर्व चुकीचं होतं; युद्धांत गुंतलेल्या लष्करी सैन्याच्या

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका








रीतीविरुद्ध तें पूर्णपणे होतं. त्या बेटाच्या किनाऱ्यावर सर्वत्र सभोंवार रक्षक असायला हवे होते; त्या शिबिराच्या भोंवती तर अधिकच रक्षक खडे हवे होते. ॲलिसनला याचं आश्चर्य वाटलं. या सर्वाचा कांहीं वेगळाच अर्थ असला पाहिजे, असं त्याला वाटलं, परंतु नक्की तें काय याचा तर्क त्याला करतां येईना.

आपल्या पोटावर पडून, आपली हनुवटी आपल्या हातांच्या उघड्या पंजावर टेकीत, परिस्थिती समजून घेण्याचा प्रयत्न करीत तो अमेरिकन नाविक त्या जपानी शिबिराकडे किलकिल्या डोळ्यांनीं लक्षपूर्वक पहात होता. अखेरीला त्यानें आपल्या मूक प्रश्नाचं उत्तर दिलं आणि तें उत्तर त्याला आवडलं नाहीं. तेथें फक्त एकच एक रक्षक होता याचं कारण तेथें धोका नव्हता असं जपान्यांना निश्चितपणें वाटत होते. शत्रूच्या फळ्यांपासून हें बेट फार दूर पिछाडीला होतं. तें इतकं दूर पिछाडीला होतं. आणि पॅसिफिकच्या त्या भागांत इतकं विपुल जपानी सैन्य होतें कीं या लोकांना लक्ष देण्याचे किंवा काळजी करण्याचं कांहीं कारण नव्हतं. निराश होत ॲलिसननें आपले डोळे मिटले. तेथें मुक्तीची आशा तरी कोणती असायची?

कांहीं थोडा वेळ निरीक्षण करून तो मार्गप्रतीक्षा करणाऱ्या त्या जोगीणीकडे परतला.

"त्यांच्याजवळ केवळ एक रक्षक आहे," तो तिला म्हणाला, "माच्यावरचा तो मनुष्य. त्याचं असंच असलं पाहिजे, त्यांचं स्वतःचं सैन्य इथून इतकं दूर गेलं असावं कीं कदाचित आकाशांतून होणाऱ्या हल्ल्याखेरीज त्यांना कशाचीच भीति वाटत नसावी. म्हणूनच तो मनुष्य त्या माच्यावर आहे. तो आकाशाची टेहळणी करीत आहे आणि कदाचित् समुद्राची. सिस्टर, माझ्यावर विश्वास ठेव, आपण रणक्षेत्रांपासून पिछाडीला भलतेच दूर आहोत–आपण पिछाडीला फार फार दूर आहोत..."

यावर तिनें क्षणभर विचार केला. "तुला म्हणायचं आहे–आपल्याला वाट पाहावी लागेल–प्रदीर्घ काळ. कदाचित्, कित्येक महिने, आपले मित्र आपल्याला शोधून काढतील, अशी आशा आपण बाळगूं शकत नाही, असंच तुला म्हणायचं आहे कां ?"

"कदाचित कित्येक वर्षें ते आपल्याला शोधून काढणार नाहींत," तो म्हणाला.

त्याच्या मुद्रेवरील भाव समजून घेण्याचा प्रयत्न करीत, ती त्याच्याकडे पहात राहिली. त्याने प्रमाणिकपणे तिच्या डोळ्यांना डोळा दिला आणि त्यांच्या परिस्थितींतील धोका जसा तिला उमजूं लागला, तसे तिचे रुंदावत जाणारे डोळे त्याने पाहिले. "होय" तो म्हणाला.

त्याने तिच्या डोळ्यांत भीति पाहिली. तिचे ओठ थरथर कांपत होते. आंधळेपणाने तिने आपला हात पुढे केला आणि त्याने आपल्या घाणेरड्या हातांत तो घेतला आणि आपल्या भीतीला तिनें काबूंत आणिपर्यंत तो त्याने घट्ट धरून ठेवला.

"अच्छा, मला वाटतं, हें मी तुला सांगायलाच हवं होतं." तो म्हणाला.

"होय," ती कुजबुजली. तिने आपला हात काढून घेतला आणि त्याच्यापासून ती पलिकडे सरकली आणि तिने हळुहळु आपल्या खड्यांत प्रवेश केला.

कोणत्याही प्रकारची भावना मनांत न आणतां, ॲलिसनने तिला आंत जातांना न्याहाळून पाहिलं. मग आपल्या श्रांत मुद्रेवरून त्याने हात फिरविला आणि ते कांहीं खाऊं शकतील असं शोधण्याकरितां तो दूर जंगलांत चालता झाला.

त्या रात्रीं ती एकमेकाशीं फार थोडं बोलली. आपल्या खड्ड्यांत आपल्या लोखंडी क्रॉससमोर त्या जोगीणीने प्रार्थना केली आणि आपल्या श्रद्धेच्या समाधानांत ती स्वतःला विसरून गेली. आपल्या विवरांत ॲलिसन पडून राहिला आणि त्याचं पोट रागारागाने जे आवाज करीत होतं ते तो ऐकत राहीला. बाहेरील जनावरांचे व पक्ष्यांचे आवाज ऐकत तो काळोखाकडे आशाशून्यतेनं टक लावून पहात राहिला. "निदान," तो कडवटपणे विचार करूं लागला, "त्यांच्याकडे अन्न आहे, आणि ते स्वतंत्र आहेत."

[१०]

## जोंवर शत्रू खेळत होता

**भुकेने** ॲलिसनचं मन अधिक स्पष्ट आणि तीक्ष्ण केलं होतं. अन्नाच्या इच्छेने त्याचा आत्मविश्वास अधिक वाढला होता व भीति कमी झाली होती. जपानी शिबिराच्या संबयी ठाऊक झाल्यामुळें, आणखी सुद्धां, त्याला आपण अधिक शूर झालों आहोंत असं वाटून. त्याने दिवसा बाहेर जाण्यांचं ठरवलं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्याने एक लांब टोकदार काठी पश्चिम किनाऱ्यावर नेली आणि भरतीबरोबर खडकाच्या खोबणांत, आलेले दोन मोठे मासे त्याने पकडले. त्या किनारपट्टीवरील पुढे मागे झालेल्या आपल्या प्रवासांत त्याने खातां येतील अशा फळांसाठीं जंगल धुंडाळलं पण त्याला यश आलें नाही.

तो परत आला तेव्हां सिस्टर ॲंजेला त्याच्या खड्ड्यांत आंत गेली. आपल्या तुटक्या सुरीने ॲलिसनने एका माशाची कातडी सोलली आणि त्याचे दोन तुकडे केले. मग, आपले डोळे मिटून, त्या थंड, न शिजवलेल्या माशाचा तुकडा त्याने झटकन तोंडांत टाकला आणि स्वतःवरच तो खाण्याची त्याने सक्ति केली. त्याला भीति वाटली होती इतकी त्याची चव वाईट नव्हती आणि बहुतेक त्याच क्षणीं त्या अन्नानं त्याच्या पोटाला फार बरं वाटलं.

त्याचा चेहरा उत्सुकतेने न्याहाळीत, त्या जोगीणीचे डोळे त्याच्यावर खिळले होते. तो तिच्याकडे पाहून हंसला, त्याने एक माशाचा तुकडा तिला दिला. आणि झटकन गिळीत दुसरा एक त्याने आपल्या तोंडांत टाकला. तिने त्याचं उदाहरण गिरविलं, आणि ती झटकन उठली आणि एक हात आपल्या तोंडावर धरीत ती घाईघाईने बाहेर गेली.

— ॲलिसनने वाट पाहिली, परंतु ती परत आली नाही. लवकरच आपल्या खड्ड्यांत हालचाल करतांना तिला त्याने ऐकली. आपल्या दातांनी तो मासा फाडीत त्याने झटकन त्या माशाला

अनुक्रमणिका

ढास मारली. त्याच्या तोंडांतून खारट द्रवपदार्थ बाहेर पडले आणि आपल्या हाताच्या तळव्याने त्याने ते पुसून टाकले.

त्याने पुकारा केला, "सिस्टर, तूं खात राहीलीस तर तो वाईट नाही."

दुसऱ्या खड्डयांतून त्याने अस्पष्ट आवाज ऐकला. तो खदखदून हंसला आणि त्याने थोडा अधिक मासा खाल्ला. मग पुनः त्याने तिला पुकारलं, "मी बाहेर जात आहे. मी परत येईपर्यंत तिथेंच थांब."

शत्रू शिबिराच्या एका टोकाला तो येऊन पोचला तेव्हां सकाळची ती मधली वेळ होती. आकाशांत एकही ढग नव्हता, आणि तें बेट व तो समुद्र सूर्याने आपल्या तेजाने डहाळून टाकला होता. शिबिराभोंवती माणसांची ये-जा चालू होती. ती तर आणि तो उध्वस्त बंगला आणि रात्रीं जियें ते सैनिक झोपत होते ते तंबू, यांच्यांत फारच ये-जा चालू होती; त्याने खाल्लेल्या माशावर त्याचं पोट सांवरलं होतं; प्रारंभीं होणाऱ्या वेदना संपल्या होत्या आणि आता त्याला झोपायचं होतं. त्या जंगलाच्या टोकाला झाडांत आणि वेलींत दडून व पडून त्याने डोळे मिटले. त्याने स्वतःशीं म्हटलं कीं एखाद्या निष्क्रीय शिबिरांत जितकें आवश्यक तितकेंच जपानी लोक सक्रीय होते; त्यापेक्षा अधिक सक्रीय नव्हते. पुरेसं सुरक्षित वाटून, क्षणभर झोपेसाठी त्याने आपले हात पाय पसरले.

त्याच्या तोंडावर आलेल्या सूर्यकिरणांनी त्याला जाग आणली. क्षणभर तो निश्चल पडून राहीला, मग सूर्यासमोरचं आपलं तोंड त्याने दुसरीकडे वळविलं आणि आपल्या शुष्क ओठां-वरून जीभ फिरविली. भूक परतली होती. दक्षतापूर्वक तो बाहेर पडला आणि शिबिराकडे त्याने पाहिलं. आतां तें सक्रीय झालं होतं. त्या तरीच्या एका बाजूला असंख्य माणसें जमा झाली होती आणि त्यांच्यांत सामील होण्यासाठीं इतरांची धडपड चालली होती. दृष्टिपथांत एकहि जहाज नव्हतं. त्याने आकाशाकडे पाहिलं व तो कान देऊन ऐकूं लागला, परंतु जंगलांतील पक्ष्यांच्या अविरत आवाजाखेरीज तो कांहीं ऐकूं शकला नाही. त्या तिथें, त्या तरीच्या एका टोकाला ते काय टेहळीत असावे याचं आश्चर्य वाटून घेत, जपान्यांचं नीट निरीक्षण करीत, तो पुनः खाली पडून राहीला.

त्या तरीकडे चालत येणारे आणखी पांच सैनिक त्याने पाहिले. ते थांबले. दूर त्या तरीवरील कुणाला तरी त्यांनी आपले हात हालविले, मग त्याच्या उजव्या बाजूला उपसागराच्या बाजूने ते वळले. मग त्या तरीकडून एक आरोळी उठली आणि पाण्यांत त्याने कित्येक पोहणारी माणसें पाहिली. आणखी कितीकांनी तरी पाण्यांत उड्या मारल्या, आणि ॲलिसनने ओळखलं कीं, ते जल-क्रीडेंत मग्न झाले होते.

तें दृश्य पाहून त्याने शिव्या दिल्या. ते जीवनाचा आनंद लुटीत होते इतकी संकटापासून सुरक्षित असल्याची निश्चिती त्यांना वाटत होती, या विचाराने एकाएकी त्याला कडवट राग आला.

त्या तरीकडून आपली दृष्टी त्याने दुसरीकडे वळवली आणि पुनः त्या शिबिराकडे न्याहाळून पाहिलं. तिथें, आश्चर्यभराने, त्याने एक माकड पाहिलं, मग दोन, मग पायऱ्यावर उड्या मार-णारी व बंगल्यांत अदृश्य होणारी चार माकडे पाहिली. एखादा क्रुद्ध जपानी त्यांची पाठ घेतो आहे व ती पुनः धावत पळत बाहेर पडताहेत, अशा अपेक्षेने त्याने दरवाजाकडे लक्षपूर्वक पाहिलं. परंतु तसं कांहीं घडलं नाही. त्या माच्यावरच्या रक्षकाकडे ॲलिसनने पाहिलं. त्या रक्षकाची त्याच्याकडे पाठ होती. तो सुद्धा जलक्रीडा निरखून पहात होता यांत संशय नव्हता.

"मला वाटतं, ती माकडं अन्न शोधीत आहेत," ॲलिसननें विचार केला. "कदाचित् त्या तिथें गोड पदार्थ असावेत." त्याचे विचार एका अफाट, अशक्य कल्पनेकडे वळले. त्यानें आपला श्वास रोखून धरला, गुडघ्यावर तो उभा राहीला, तो रक्षक, ते पोहणारे, त्या तरीवरचा तो जवान यांचं निरीक्षण करीत त्या शिबिराभोंवतीं त्यानें त्वरेनें दृष्टी फिरविली. मग पुनः त्या बंगल्याकडे त्यानें वळून पाहिलं. त्याच्या थरारून गेलेल्या हृदयाचे ठोके धडधडतांना तो ऐकूं शकत होता.

अकस्मात् आपल्या पायांवर त्यानें उडी मारली. लपून राहतां येईल अशा जागा धुंडाळीत त्यानें तो माचा व आपल्यामधील जमिनीचा अभ्यासपूर्ण अंदाज घेतला. त्याच्या तोंडाला कोरड पडली होती आणि त्याला धाप लागली होती. त्याच्या पायांना क्षीणता जाणवली, परंतु हा दुबळेपणा त्यानें झगडून घालविला. मनाची तयारी करीत, क्षणभर तो निश्चल राहीला.

मग त्या बंगल्यापासून पन्नास यार्ड जवळ असलेल्या एका प्रचंड झाडाकडे तो धांवला. माच्यावरील माणसाकडे त्यानें पाहिलें. तो मनुष्य निर्धास्त होता, त्याची पाठ ॲलिसनकडे होती, त्या उपसागरांतील पोहणाऱ्यांवर त्याची दृष्टि खिळली होती. करड्या गवताच्या एका तुकड्यावरून ॲलिसन धूम पळत गेला. पलिकडे गेला आणि बाँबमुळें पडलेल्या एका खड्डयांत त्यानें स्वतःला झोंकून दिलें. त्याच्या कडा अगोदरच झुडुपांनीं आणि वेलींनीं आच्छादून टाकल्या होत्या. श्वास घेण्याचा प्रयत्न करीत, तोंड जमिनीला टेकून तो पडून राहिला.

ॲलिसननें आपलं डोकं वर उचललं आणि त्या माच्यावरील त्या रक्षकानें हालचाल केली. त्यानें ॲलिसनला आपलें डोकें झटकन् खालीं ठेवण्यास भाग पाडलें. त्या नाविकानें पुनः वर पाहिलं, तेव्हां तो रक्षक अजूनहि ती जलक्रीडा रंगून पहात होता. ॲलिसननं आपला श्वास रोखून धरला, त्या बाँबनें पाडलेल्या खड्डयांतून तो बाहेर पडला, आणि कांहीं आंखूड झुडुपांच्या मागे असलेल्या जागेंत लपण्यासाठीं तो धांवत गेला. तिथें तो वाट पहात राहिला. त्याची भीति वाढत होती; त्याचं धैर्य एकाएकी गळलं; जंगलांत पुनः मागे परतण्याची त्याला इच्छा झाली—या वेड्या कल्पनेपासून व ओंगळ धोक्यापासून दूर. एखाद्या बेढूट माणसाप्रमाणें मागे वळून पळण्याखेरीज, तो मागे जाऊं शकत नव्हता, मागे जाण्यासाठीं पाऊल पुढें टाकूं शकत नव्हता,

हें जसं त्यानं ओळखलं, तसं त्याची धास्ती वाढत गेली. त्यामुळें त्या रक्षकाचं लगेच त्याच्याकडे लक्ष वेधणार होतं; असं लक्ष कीं, त्यानें नक्कीच आपल्या बंदुकीचा उपयोग केला असता. मग अकस्मात् ती भीतीची भावना ॲलिसनला सोडून गेली. त्याच्या मनाला शांत व थंड वाटलं. त्याच्या देहाला स्थिरता व ताकद आल्यासारखी वाटली.

तो उठून उभा राहिला, आपले हात त्यानें आपल्या खिशांत घातले, दर दिवशीं कामावर जाणाऱ्या माणसाप्रमाणें सावकाश सहज पावलें टाकीत तो बंगल्याकडे चालत गेला. ह्या सर्व काळांत त्यानें आपली दृष्टी त्या माच्यावरील माणसावर आणि त्याच्या समोरच्या जमिनीवर रोखून धरली होती. सुमारें शंभर फूट अंतर होतं.

कांहीं घडलं नाहीं. पोहणाऱ्यांच्या आरोळ्या तो ऐकूं शकत होता आणि त्या आवाजानें त्याला शांत केलं. जियें बॉंबनें एक खड्डा निर्माण केला होता व जो जाडजूड कापडाने आच्छादिलेला होता अशा जागीं बंगल्याच्या भिंतीच्या बाजूनें तो गुपचुप गेला. निश्चलपणाच्या त्या क्षणांत त्यानें निरखून पाहिलं व कानोसा घेतला. मग त्यानें आपले बूट काढून घेतले आणि त्या विवरांतून त्या कापडाखालीं तो उतरला. आतां तो बंगल्यांत आला होता. तो पुनः प्रशिक्षित सैनिक बनला होता; त्यानें स्वतःला नीट काबूंत ठेवलं होतं.

ॲलिसनला आढळलं कीं, ह्या खोलीचा उपयोग जपानी लोक कचेरीसाठीं करीत होते. भिंतीवर नकाशे लोंबकळत होते. खिडकी-जवळच वर टंकयंत्र ठेवलेलं एक उतरतं मेज होतं. पुस्तकें आणि कागद एकावर एक रचून ठेवलेलं एक मोठं टेबल खोलीच्या मध्य-भागीं होतं. त्याचे डोळे त्या सर्वांवरून झटकन फिरले आणि तो दिवाणखान्यांत सटकला. शत्रू येण्यापूर्वीं पाहिलेली बंगल्यांतील खोल्यांची रचना आठवून ॲलिसन तत्काळ स्वयंपाक-घरांत गेला. तेथें त्याला पेटचा, पिशव्या आणि पाकिटांचे ढीग आढळले. त्यांपैकीं कांहींवर आंकड्यांच्या खुणा केलेल्या आणि अमेरिकन नांवें त्यानें पाहिलीं. हीं फिलिपिन्समधून आणलेली असावीत असा त्यानें तर्क केला.

जरासाही कुणाचा आवाज येतो कां हें ऐकत, त्यानें भराभर व मूकपणें काम केलें. बाहेर कुणाचा तरी भसाडा आवाज ऐकूं आला त्यावेळीं त्यानें एक पिशवी जवळ जवळ पूर्ण भरली होती. त्यानें दिवाणखान्यांत उडी मारली आणि स्नायूंदेखील न हालवतां, दूरवरून येणारं उत्तर ऐकत तो तेथें उभा राहिला. पायऱ्यांवर बुटांचा आवाज झाला. ॲलिसन कचेरींत धांवत गेला, तिथें क्षणभर निमूटपणें उभा राहिला नंतर भिंतीच्या भोंकावरील कापडाकडे तो गेला व तें त्यानें वर उचललें. कुणीहि दृष्टिपथांत येत नव्हतं. त्या भिंतीपासून सुमारें पंधरा फुटांवर, जमिनींत बॉम्बगोळ्यांनीं तयार केलेला तो खड्डा होता.

अन्नाची पिशवी घट्ट पकडीत, ॲलिसन भिंतीच्या भगदाडांतून पलिकडे गेला आणि त्या बॉम्ब-खड्ड्याकडे पंधरा फूट धांवत गेला. तिथें तो गुडघे टेकीत खाली गेला, त्यानें आपली पाठ वांकविली आणि आपलं डोकं जमिनीला टेकलं. तिथें क्षणापूर्वींच त्याचं धैर्य एकदम त्याला सोडून गेलं. त्याला दुबळेपणा व आजार आल्यासारखा वाटला. तथापि, क्षणांतच पुनः त्याच्या मनाने ताबा मिळविला, आणि त्याचे स्नायू स्थिरावले. आपल्या एका अंगावर पडून घेत त्यानें अधिक सोयीस्करपणें आपली जागा काळजीपूर्वक बदलली; कारण तिथून तो बॉम्ब-खड्ड्याचा माथा न्याहाळूं शकत होता.

त्यानें बंगल्यांतील बोलण्याचे आवाज ऐकले; बाहेरचे दूर व जवळचे इतर आवाजही ऐकले. आपल्या विचारांना त्याने नीट वळण लावलं आणि आपल्या पुढील पवित्र्याची योजना कर-ण्याचा तो प्रयत्न करूं लागला. मग आपण या खड्ड्यांत उडी मारल्याबद्दल त्याला वाईट वाटलं, कारण निदान रात्र होईपर्यंत तरी त्याला त्यांत पडून रहाणं आवश्यक होतें.

आणखी निदान तीन चार तास तरी काळोख पडणार नाहीं, असं त्याला वाटलं. तो आल्यावर, तें शिबिर झोपीं जाईपर्यंत आणखी कांहीं अधिक तास त्याला थांबावं लागणार होतं. भोंवतालच्या आवाजांचा कानोसा घेत, त्यानें वेळेचा अंदाज करण्याचा कांहीं मार्ग सांपडतो कां याचा विचार करण्याचा प्रयत्न केला. पण काळ थांबल्या-सारखा वाटत होता. केवळ त्याच्याखेरीज त्या खड्ड्यांत कुणी नव्हतं आणि तो डोकं केव्हां वर काढतो याची वाट पहात सर्वत्र भोंवती जपानी लोक होते. पानांतून आणि त्याच्या शरीरावरून वस्तु सरपटत होत्या. त्याच्या अंगरख्याखालीं, त्याच्या विजारींच्या टोकांवर, त्यावर सरपटत होत्या आणि त्याच्या मानेच्या मागच्या भागावर त्या सरपटत होत्या. त्या बॉम्ब-खड्ड्याच्या माथ्यावरील वेलींत अंगावर कुसरं असलेले इवलेसे जीव-जीवाणूं वर सरकत होते. त्याच्या डोक्यावर कृमिकिटक ताटकळले होते; जणूं त्याच्या-वर हल्ला करायचा किंवा नाहीं याचा ते विचार करीत होते. एकदां एक चकचकीत हिरवा साप त्याच्या पायांवरून सहज सरपटत पलिकडे गेला आणि त्याच्या मागील बाजूला अदृश्य झाला तेव्हां त्याचं रक्त गोठल्यासारखं झालं. आपल्या डाव्या पायावर जरा वरच्या बाजूला, आपल्या अंगांतून एखाद्या लाल तापलेल्या सुई-सारखं कांहीं खुपसलं गेलं असं त्याला वाटलं, परंतु तें जीवाणूं तो पाहूं शकत नव्हता किंवा ज्यानें त्याला ती वेदना दिली तो साप त्याला दिसूं शकत नव्हता.



अनुक्रमणिका

तासामागून तास गेले, तरी पण ॲलिसनच्या दृष्टीनें काळ तटस्थ होऊन थांबला होता. अधून मधून आपलं डोकं वर उचलण्याची व शत्रूंकडे पाहण्याची एक वेडी इच्छा त्याला होत होती. आपलं डोकं खाली ठेवण्याची त्याला स्वतःवरच सक्ती करावी लागत होती. त्यानें आपल्या मनाला भविष्यकाळांत भिरकाविण्याचा प्रयत्न केला. "तूं जेव्हां पुनः घरीं असशील," त्यानें स्वतःशींच म्हटलं, "जेव्हां तूं पुनः घरीं परतलेला असशील, तेव्हां हें सर्व तूं आठवूं शकतोस. जेव्हां तें सर्व तुझ्या मागे राहीलेलं असेल, संपलेलं...सर्व कांहीं संपलेलं असेल..."

तो जवळ जवळ झोपलाच होता, आणि धक्क्यानें जागा झाला. तो पाहूं शकला तीं सर्व पानें त्यानें मोजली. त्याचा शोध लागलेला असेल तेव्हां आपल्याला किती पगार मिळेल, तो मोजण्याचा त्यानें खटाटोप केला आणि आपण तो खर्च करीत आहोंत अशी कल्पना त्यानें केली. "पहिल्यांदा, पैशांनीं मिळूं शकतं असं सर्वांत सुंदर जेवण मी घेईन," तो विचार करूं लागला. "आणि मग—"

एक मोठी आरोळी त्याच्या विचारांत येऊन मिसळली. त्यांच्या स्वयंपाक-घरांतून हरवलेल्या अन्नाचा शोध जपान्यांनीं लावला आहे असें समजून, त्यानें स्वतःलाच खड्डयांत आणखी खाली सारलं. परंतु त्या आरोळीला प्रत्युत्तर म्हणून माणसें हंसत होती आणि त्यानें पुनः सुटकेचा श्वास टाकला मग पूर्वी न पाहिलेली एक पड-छाया त्यानें नजरेनें टिपली. त्यानें तिच्याकडे टक लावून पाहिलं आणि काळ थांबलेला नाहीं हें त्याच्या लक्षांत आलं. त्या छायेचा अर्थ असा होता कीं, दिवस संपुष्टांत येत होता.

लवकरच ती छाया अधिकच मोठी झाली. आकाश आपल्या तेजाला मुकलं होतं. बॉम्ब-खड्डयाभोंवतालच्या झाडांत तो पक्ष्यांचें ओरडणं ऐकूं शकत होता. त्यानंतर लवकरच, काळोख पडला.

त्यानें सुटकेचा एक उसासा टाकला आणि काळजीपूर्वक आपले पाय पसरले. त्या बॉम्ब-खड्डयाच्या टोंकावरून त्यानें वर पाहिलं; परंतु त्या शिबिराचा निळा मंद प्रकाश आणि त्याच्यापासून दूर हालणाऱ्या एका छायाकृतींखेरीज त्याला कांहीं आढळलं नाहीं. तिथें माणसांचें आवाज व बंगल्याच्या जमिनीवरील बुटांच्या पायाचा आवाज ऐकूं येत होता; परंतु त्या आवाजांत भिण्यासारखं कांहीं नव्हतं. हळुहळु तें शिबिर शांत झालं.

त्यानें तिथून निसटणं बहुतेक सुरक्षितपणाचं होतं, पण अगदीं तितकं नव्हतं. त्याची सहनशीलता कमी कमी होऊं लागली. निस-टण्याच्या इच्छेनें त्यानें अन्नाची पिशवी चांचपून पाहिली परंतु थांबण्याची तो स्वतःवर सक्ती करीत होता. "तुला इतकी घाई कशाची ?" त्यानें स्वतःला विचारलं, "सारी रात्र तुझीच आहे." आतां तो त्या बॉम्ब-खड्डयाच्या भिंतींना पाठ टेकून बसला; त्याचं डोकं जमिनीवर होतं; तो सभोंवार पहात होता व ऐकत होता. याने आजवर पाहिलेल्या वस्तूंत तो काळोख हाच सर्वांत अत्यंत सुंदर होता.

मागाहून त्या उपसागरावरील जंगलाच्या त्या टोककडे तो गपचूप चालत गेला. तो तेथें क्षणभर थांबला. त्याच्या परीचयाचे रात्रीचे आवाज त्याच्यासभोंवार सर्वत्र होत होते, आणि आपण सुखरुप आहोंत हें त्यानं ओळखलं. त्याच्या पायांना कापरं भरलं व ते खाली वांकले, आणि क्षणभर त्याला विश्रांति घ्यावी लागली. त्यानें प्रवासाला प्रारंभ केला तेव्हां सर्व ताकद व चैतन्य त्याला सोडून गेलं होतं. तो थकला होता आणि ताण पडल्यामुळें आजारी झाला होता. ती अन्नाची पिशवी घेऊन तो स्वतःला क्वचितच पुढें चालवूं शकत होता. शेवटीं एकदाचा तो खड्डयांकडे येऊन पोंचला आणि क्षीणपणें ओरडला, "सिस्टर सिस्टर ! मी आलो आहे. ॲलिसन."

उत्तर आलं नाहीं. घाबरून तो त्या जोगीणीच्या खड्डयांत उत-रला; पण ती तेथें नव्हती. [क्रमशः]



अनुक्रमणिका









# सावधान !

रेल्वेचें फाटक (मार्ग) ओलांडताना काळजी घ्या !

हें एक असेंच फाटक (मार्ग) आहे. येथें कोणी मार्गदर्शक नसतो.

भारतांत अशी २०,००० रेल्वे-फाटकें (मार्ग) आहेत.






डिरेक्टोरेट ऑफ सेफ्टी रेल्वे बोर्ड द्वारा खास प्रवाशांसाठीं प्रकाशित.






—गो. गो. दाते

**"माझ्या दुकानाच्या कामांत मदत करावी लागेल" त्यानें अट घातली. तिनें ती मानली. कारण बऱ्याच 'नकारा'-नंतर 'होकार' आला होता. तिनें अट कृतींतही उतरविली. पण........**

**आपल्या** लाडक्या बाळाला कोणीं नांवें ठेवलीं तर तें म्हणें बायकांना सहन होत नाहीं. आपलं पोर शेंबडं लेंबडं कसंही असो तें बायकांना प्राणाहून प्रिय असतें; आणि म्हणून त्याला कोणीं नांवें ठेवलीं, तर त्यांना स्वतःच्या अंगाला कांटे टोचल्यागत दुःख होतें. . . फार हळव्या असतात बायका ह्या बाबतींत. . .

पण नवऱ्याच्या बाबतींत असला हळवे-पणा विनोदिनी दाखवी; तसा तो थोड्याच दुसऱ्या बायका दाखवीत असतील !

आणि ही विनोदिनी कोणी अल्पशिक्षित, भोळीभाबडी स्त्री नव्हती: चांगली बी. ए. झालेली होती. नवऱ्याचं पटप सुशिक्षित स्त्रिया फारसं करीत नाहींत असं समजलं जातं. विनोदिनी त्याला अपवाद होती.

तिचा नवरा, विश्वास, स्टेशनरी मालाच्या दुकानाचा मालक होता.

ज्या वेळीं विनोदिनीच्या अन् विश्वासच्या लग्नाचे बेत होऊं लागले, तेव्हां त्यानें तिला सांगितलें होतें, "माझं दुकान चांगलं चालतं हें तुला माहितच आहे. खरं म्हटलं, तर हें दुकानच मी चांगल्या तऱ्हेनें चालवलं, तर मला आर्थिक विवंचना करण्याचं कारण राहणार नाहीं. पण हें दुकान आज चल-तींत आहे त्याचं बरचसं श्रेय माझ्या वडि-लांचं अन् त्यांच्याहूनही जास्त माझ्या मोठ्या भावाचं आहे. धंद्यांत त्यानं इतकं लक्ष घातलं होतं कीं, वयाची तिशी उलटून गेली, तरी त्यानं स्वतःचं लग्न करण्याचा सुद्धां विचार मनांत आणला नाहीं ! पुढं आमच्या आबांनीं त्याच्या लग्नाच्या बाब-तींत अगदीं निर्वाणीची भाषा सुरू केली, तेव्हां तो लग्न करायला कबूल झाला होता. . . .एका ठिकाणीं मुलगी पसंत पडून लग्नाचं जमत आलं होतं; पण विचित्र योग असा कीं, कांहीं कारण घडून तें लग्न एक महिना लांबणीवर पडलं; अन् दरम्यान माझ्या भावाचा जीवनग्रंथच आटोपला ! खरं म्हटलं, तर मला ह्या दुकानदारींत शिरायचं नव्हतं; पण भाऊच्या अनपेक्षित मृत्यूमुळें मला ह्या धंद्यांत पडावं लागलं. मात्र मी जो पडलों, तो अंग चोरून बेहिंमतीपणानें, 'रडत राऊत घोड्यावर,' अशा मनोवृत्तीनें पडलों नाहीं. भावाची अपुरी इच्छा पुरी करायची, वडिलांना कर्त्या-कर्तबगार मुलाच्या मृत्यूचा विसर पाडायचा ह्या हिरीरीनें मी धंद्यांत लक्ष घालूं लागलों. अन् जसजशा धंद्यांतल्या मख्ख्या मला अधिकाधिक कळत गेल्या तसतसं माझं धंद्यांतलं Interest वाढत

गेलं. . . . . . . . . .आतां आहे हें दुकान असंच चालू ठेवण्यावर माझं समाधान नाहीं. मी फाइल्स्, बाउंडबुकें, एनव्हलप्स् . . . वगैरे बनविण्याच्या खटपटींत आहे. माझा हा व्याप जसा वाढेल, तसं माझ्या दुकानाच्या कामांत सहकार्य करावं लागेल. तें तुला कितपत आवडेल ह्याचा विचार कर. . . .

विनोदिनीनें तो विचार केला होता. आणि विश्वासला अनुकुलता दर्शविली होती.

वस्तुस्थिति अशी होती कीं, विश्वासशीं दुकानच्या कामांत सहकार्य करायचं म्हणजे काय ह्याची नीटशी कल्पना तिला नव्हती, आणि तशी ती करून घेण्याचा तिनें प्रयत्नही केला नाहीं. तिनें विचार केला तो एवढाच कीं, आतांपर्यंत किमान् पंचवीस ठिकाणीं तरी नापसंतीचा शिक्का आपल्यावर बसलेला आहे ! आपल्या रूपाची जी थोडीफार रास्त अरास्त घमेंड आपल्यांत होती ती साफ उतरलेली आहे ! आपलें वय पंचविशीच्या पुढें गेल्यामुळें आपल्यांतल्या सौकुमार्याला ग्रामफोनच्या जुन्या रेकॉर्डची रया येत चालली आहे; एखादी मोहक मुखपृष्ठाची कादंबरी वाचायला हातांत घ्यावी–चार सहा पानं वाचून झाल्यावर ती पुढं वाचवूं नये ती टाकून द्यावी. पुनः कंटाळा आला कीं, वाचायला घ्यावी, पुनः टाकून द्यावी...तसं कांहीं तरी स्वतःच्या आयुष्याबद्दल आपल्याला वाटूं लागलं आहे... आतांपर्यंत जेवढे तरुण पुरुष आपल्याला 'पाहायला' म्हणून आले, त्यांच्यांत विश्वाससारखा आकर्षक उमदेपणा एकांतही नव्हता....विश्वास दुकानदार असला, तरी आपल्याइतका शिकलेला आहे, हुषार तर तो खासच आहे....त्याची आर्थिक स्थिति समाधानकारक आहे... तेव्हां.... 'सहकार्य करावयाचें म्हणजे काय करायचें ?' असले आशंकावजा प्रश्न त्याला विचारून त्याला न बिचकवणें हेंच योग्य....लग्न झाल्यावर त्याच्याकडून समजून घेऊं....

लग्न झालें.

लग्नाची नवी ताजी नवलाई ओसरत चालली....

मग विनोदिनीला वाटूं लागलें आतां, विश्वास लग्नापूर्वी ज्याबद्दल बोलला होता त्या त्याच्या कामांतील सहकार्याबद्दल सूतोवाच करणार....

ती पहात होती कीं, सकाळपासून रात्रीं घरीं परत येईपर्यंत तो कामाच्या विचारांत योजनांत, खटपटींत, व्यापारांत गुंतलेला असतो. तो दुपारीं जेवायला आला कीं, जेमतेम एक तास घरांत असे.

त्याचे वडील धंद्यांतून निवृत्त झाले होते. त्यांना मधुमेहाचा विकार जडला होता; अन् तरुण, कर्त्या मुलाच्या मृत्यूनें त्यांनीं हाय खाल्ली होती ! त्यामुळें त्यांचीच घरांत तैनात ठेवावी लागत होती. विनोदिनी ती ठेवीत होती.

विनोदिनीला एक आतेसासू होती... ती कशीबशी 'चूल संभाळीत' होती. पण, विनोदिनी, घरांत आल्यावर तिनें तो 'चार्ज' तिच्याकडे दिला. 'मला तरी होतंय कुठं ?' ती म्हणाली, 'विश्वासचं लग्न होतंय केव्हां ह्याची वाटच पहात होती मी ! तुला सगळं करतां सवरतां येतंय. तुझं तूं संभाळ आतां.'

विनोदिनीच्या ताब्यांत घर आल्यावर तिनें घरांत कुठें कुठें काय काय आहे हें पाहावयास सुरुवात केली. घरांत कांहीं होतं नवं अन् बरंचसं जुनं; टाकून दिलेलं पण उपयुक्त ; टाकून न दिलेलं, इकडं तिकडं लुडबुडणारं पण निरुपयोगी, मूल्यवान् पण अवजड; भारी पण कुबटलेलं–कसर लागूं लागलेलं.... तें सगळं पाहण्याला अन् पारखण्याला तिला चार महिने पुरले नाहींत !

ती एकदां विश्वासला म्हणाली, "अहो, त्या सात आठ मोठ्या गाद्या आपल्या घरांत आहेत त्या, मला वाटतं, गेल्या अर्धशतकांत कोणी उघडलेल्या नसाव्यात ! इतक्या खराब झालेल्या आहेत त्या ! उसवायला देऊं का त्या गाद्या पिंजाऱ्याकडे?"

"दे," तो म्हणाला, "घर तुझं आहे. आपल्या आवाक्यांत जें बसेल तें नवं करण्याची तुला पूर्ण मुभा आहे !"

घरांत आणि घरांतल्या वस्तूंत, सोयींत रूपांतर करण्याचें काम सहा महिने उलटून गेले, तरी पूर्ण झालें असें विनोदिनीला वाटेना !

लग्न होऊन एक वर्ष उलटून गेलें. आबांच्या प्रकृतीचें मान दर दिवशीं खालींच चाललें होतें. 'त्यांचा आतां कांहीं नेम नाहीं' असंच डॉक्टर सुद्धां म्हणूं लागले होते !

घर आणि आबा ह्यांना संभाळण्यापुढें विश्वासला त्याच्या कामांत मदत करण्याचें विनोदिनीला मनावर घेतां आलेलें नव्हतें. त्यानेंही तसलें कांहीं बोलणें तिच्याजवळ काढलेलें नव्हतें ह्याचें तिला जरा नवल वाटूं लागलें होतें. आबांच्या चिंताजनक प्रकृतिमानामुळेंच तें झालेलें असावें अशी तिनें स्वतःची समजूत करून घेतली.

तरीही, तिनें त्याचा दुपारचा चहा घेऊन त्याच्या दुकानांत जायला सुरुवात केली. दुकानाच्या मागच्या बाजूला त्याचा फाइल्स्, एनव्हलप्स्... वगैरे बनविण्याचा लहानसा कारखाना होता.

विश्वासला चहा देण्यासाठीं दुकानांत गेल्यावर ती थोडावेळ तेथेंच बसूं लागली. एखाद्या गिऱ्हाईकाला मोड दे; कुणाची एखादी वस्तू बांधून दे; एखादं खोक विश्वासला काढून दे; एखाद्या गिऱ्हाईकाचं स्वागत कर... अशी कांहीं कांहीं किरकोळ कामं करण्याचा ती प्रयत्न करी.

दुकानांतल्या त्या शेकडों वस्तू; तीं नाना प्रकारचीं खोकीं, त्या बरण्या; ती मोजमापं; ह्या डझनावरच्या; ग्रोसवरच्या, किरकोळीच्या किमती; ते अर्धे, पाव, अष्टमांश हिशोब; ती खरींखोटीं नाणीं; अन् तीं भावखाऊ गिऱ्हाइकं !!..... विनोदिनीला दुकानांतल्या त्या वस्तूंत, माणसांत आणि वातावरणांत डबगल्यागत, गोंधळल्यागत होत असे !

शायांच्या त्या प्रचंड, नळीवाल्या बाटल्या जलोदरासारखा विकार होऊन अंग सुजलेल्या माणसागत तिला कशाशाच दिसत !

नुसतीं साधीं बटनं घेतलीं, तरी त्या बटनांचे किती प्रकार किती निरनिराळे भाव ! इतक्या अनेकविध वस्तूंचे भाव कसे ठरविले जातात अन् ते लक्षांत कसे राहतात ह्याचा तिला अचंबाच वाटे ! फाऊन्टन पेनं सगळींच चांगलीं. चकचकीत, तुकतुकीत दिसत. एकाची किंमत दीड

रुपया तर दुसऱ्याची साडेपांच तर तिसऱ्याची अठरा ! अन् त्या गिऱ्हाईकांच्या चिकित्सा ! ह्याचे आटे ढिले आहेत–तर ह्याचे फार टाइट् आहेत ! ह्याचें निव् चांगलें आहे, पण रंग चांगला नाहीं. ह्यानं अक्षर किरटं येतं त्यानं फार जाड येतं. दहा पेनं पाहून व दुकानदाराचा अर्धा-तास वेळ खाऊन शेवटीं पेन् न घेतां गिऱ्हाईक दुकानाबाहेर पडलं, तर डोकं थंड कसं ठेवायचं ? विश्वासाचे दुकान मालानें ठेचून भरलें होतें... मालाचें जणूं त्याला अजीर्ण झालें होतें ! त्यांतला कांहीं कांहीं माल ठेवून ठेवून खराबसुद्धां झाला होता ! अन् तरीही नव्या नव्या मालाची खरेदी त्याची नेहमींच चालू असे ! ह्या एवढ्या खरेदींत विक्रींत अन् इतका माल पडून असतांना आपल्याला फायदा होतोय का तोटा हें विश्वासला कळतें कसें हें तिला एक कोडेंच वाटे ! चार आण्याची एक पेन्सिल, दऊत भरून पेनची शाई, दोन दस्ते कागद, एक ग्लूको बिस्किटाचा पुडा.... असली विक्री तिला बिकट वाटत नसे. पण कागदाचं अर्ध रीम घेतलं, तर काय भाव देणार ?' 'अमक्या कंपनीचीं एन्व्हलप्स ह्या भावानें मिळतात मग तुमचीं कां नाहीं ?' 'बारा ग्रोसची ऑर्डर देता का ? एक आणा भाव कमी लावतो...' असल्या प्रश्नांना उत्तरें कशीं द्यायचीं, अन् असले व्यवहार उलगडायचे कसे हें आपल्या कधींच आटोक्यांत येणं शक्य नाहीं असं तिला वाटूं लागलं. भाजी फोडणीस टाकणं, भात वैरणं, पोळ्या लाटणं निराळं अन् शंभर–दीडशें पानांचा जिलबीचा स्वयंपाक करणं निराळं !

विनोदिनी दुकानांत जाऊं लागली, अन् रोज थोडावेळ तेथें बसूं लागली ह्याबद्दल विश्वास कांहींतरी अनुकूल बोलेल, आपल्याला उत्तेजन देईल, आपणहून आपल्याला कांहीं माहिती करून देईल अशी तिनें अपेक्षा केली होती.

पण तसें त्यानें कांहींच केलें नाहीं ह्याचें तिला आश्चर्य वाटूं लागलें. थोडा वेळ ती दुकानांत बसली कीं, तो तिला घरीं जायला सांगे !

ह्यासंबंधीं तिनें त्याला कांहीं विचारलें नाहीं, कारण तो विषय त्याच्याजवळ काढण्याला ती बिचकत होती ! आणि बिचकण्याचें कारण तरी हेंच होतें कीं, ती त्या दुकानच्या कामांत सहकार्य करण्याचें आपल्याला कितपत जमेल ह्याबद्दल तिला स्वतःलाच फार संदेह वाटत होता ! ती ज्या प्रकारच्या वातावरणांत, परिस्थितींत वाढलेली होती त्यांच्याशीं तें दुकानी-काम सर्वस्वीं विसंगत होतं ! तिला थोडा फार नोकरीचा अनुभव होता. नोकरींत एका वरिष्ठाला संभाळलं कीं, काम भागतं. दुकानांत प्रत्येक गिऱ्हाईकाला खूष करण्याचा प्रयत्न करावा लागतो ! नोकरी करतांना privacy वाटते, दुकानी–काम करतांना बाजारांत उभं राहिल्यागत वाटतं ! दुकानांत पैशासाठीं जणूं एकसारखी शिकार करावी लागते. आपला नवरा तें काम करण्यांत तरबेज झाला आहे ह्याबद्दल तिला त्याचें फार कौतुक वाटे; त्याच्या निरलसपणाचा, महत्त्वाकांक्षीपणाचा, व्यवहारचातुर्याचा, अभिमान वाटे ! त्याच्या संबंधीं दुसऱ्या कोणाजवळ बोलण्याचा प्रसंग आला, तर 'आमचं दुकान', 'आमचा कारखाना', 'आमचा माल,' 'आमचा धंदा, भांडवल', अशी कांहींशीं आढ्यतेची भाषा ती वापरी ! 'ह्या' ना अजीबात सवड नसते हो !" "Time is money !" हें "ह्यांच्या बाबतींत अक्षरशः खरं आहे !" "ह्यांची' दोन बँकांत खातीं आहेत !" "मुंबईला गेले आहेत हे.... अबदुल रहमान स्ट्रीटवरच्या 'स्टार स्टेशनरी मार्ट'चा 'ह्यांना फोन आला होता काल; म्हणून गेले आहेत !"–असं कांहींतरी आपल्या नवऱ्याबद्दल इतरांना सांगतांना तिला अंगावर मूठभर मांस चढल्यागत वाटे ! विश्वासचा उल्लेख दुकानदार असा केला गेलेला तिला आवडत नसे ! आपल्या नवऱ्याच्या व्यवसायाचा उल्लेख ती 'व्यापार', 'कारखानदारी' असा करी ! दुकानदार हा कोणी कमी प्रतीचा माणूस आहे असं कोणी एखादी व्यक्ती मानते असं तिला प्रत्यक्ष अप्रत्यक्ष रीतीनें समजलें

तर त्या व्यक्तिबद्दलं तिच्या मनांत चांगलीच अढी निर्माण होई ?

पण नवऱ्याबद्दल अभिमान वाटला, तरी त्याच्या त्या व्यापारांत कामाची भागीदारी करण्याची कल्पना तिला रुचत नव्हती. दुकानांत ती बसूं लागली, तेव्हां तिला केव्हां केव्हां असाही संशय येई कीं, एखादे गिऱ्हाईक आपल्याकडे पाहून दुकानांत शिरतें कीं काय ?

दुकानांत बसणें तिला मनांतून आवडतच नव्हतें. त्यामुळें विश्वास तिला त्या बाबतींत उत्तेजन देत नव्हता ह्याचें तिला आश्चर्य वाटत असलें, तरी मनांतून तें बरेंच वाटत होतें.

तरीही तिनें दुकानांत जाणें बंद केलें नाहीं. दुकानांत जाऊन तासभर ती तेथें बसे. तिच्या त्या तेवढ्या कामाचा विश्वासला फारसा उपयोग होत नव्हता हें तिला कळत होतें. पण दुहेरी हेतूनें ती तेथें बसत होती. एक त्यामुळें तिचा दुकानाच्या व्यवहाराशीं अधिक परिचय होत होता; आणि दुसरा विश्वासला प्रत्यक्ष मदत फारशी होत नसली, तरी आपण मदतीची कांहींच तयारी दाखविली नाहीं, तर आपल्याबद्दल त्याच्या मनांत कांहीं गैरसमज निर्माण होईल अशी तिला भीति वाटत होती ! आपल्याबद्दल त्याचें मत बिलकुल बिघडूं नये ह्याला ती फार जपत होती.

अखेर बाबा गेले !

विनोदिनीला घरांत अगदींच एकटं एकटं वाटूं नये, म्हणून तिची आई तिच्याकडे येऊन राहिली होती. महिनाभरानें परत गेली.

आतां दुकानासाठीं अधिक वेळ द्यावयाचा असें विनोदिनीनें ठरविलें. आणि तिनें अपेक्षा केली कीं, विश्वास आतां Seriously आपल्याला दुकानांतील व्यवहारा संबंधीं माहिती देईल...

पण तिच्या अधिक वेळ दुकानांत येऊन बसण्याला त्यानें विरोध केला !

आपल्याला मनांतून तें काम आवडत नाहीं हें त्यानें ओळखलें असलें पाहिजे असें तिला वाटूं लागलें. पण त्याचा भार हलका करणें तिचें कर्तव्यच नव्हतें काय ?



अनुक्रमणिका

तिनें अधिक उत्साह, अधिक हौस दाखविणें जरूर होतें.

म्हणून एकदां रात्रीं ती दोघं निवांतपणीं बोलत असतां ती त्याला म्हणाली, "आतां मला रोज थोडं थोडं तुमचं व्यापारीशास्त्र शिकवायला वेळ काढत जा कीं !"

"व्यापारीशास्त्र शिकवायला मी त्या शास्त्राचा प्रोफेसर थोडाच आहे ?" तो म्हणाला.

"मग मला तरी परीक्षेला थोडंच बसायचंय् बी. कॉम्.च्या ! पण हल्ली मला त्यांतलं कांहींच कळत नाहीं. दुकानांत बसल्यावरही त्यांतली कोणीतरी जाणती आहे असं गिऱ्हाईकाला वाटायला नको कां ? दुकानांत काय अन् कुठंहि काय काम करणाऱ्या माणसांवरून ज्याचा तिथं संबंध येतो तो आपलं impression बनवतो. मला अलीकडे दोन तीन वेळां असा अनुभव आला कीं, माझ्या बावळटपणावर नाखूष होऊन गिऱ्हाईकं माझी मस्करी करीत दुकानाबाहेर पडलीं !"

विश्वास हंसला—हेतुपूर्वक हंसला.

"कां हो हंसलात कां ?" विनोदिनीनें विचारलें.

"मी जर गिऱ्हाईक म्हणून दुकानांत आलों असतो, तर मलासुद्धां तुझें हंसू आलें असतें !"

"इतकं हास्यास्पद वागते मी तिथं ?"

"हास्यास्पद असं कांहीं मी म्हणत नाहीं; ss... पण... You seem to be a round peg in square hole, there !!"

त्याचा तो शेरा ऐकून ती खट्टू झाली; अन् गप्प बसली.

विश्वासनें तें ओळखलें आणि तो म्हणाला, "म्हणजे तुझ्यांतला दोष दाखवला नाहीं मी हा !"

"बावळटपणा हा गुण वाटतं ? तिनं तुटकपणानें विचारलें.

"अग बये, एखादा कुशल लेखक फाऊंटनपेननें फार चांगलं वाङमय लिहितो, म्हणून त्याला फाऊंटनची दुरुस्तीही करतां येईल अशी अपेक्षा करणं हास्यास्पद होणार नाहीं कां ?"

"पण मी कुशल लेखक नाहीं....."

"नाहींस कशी ? आहेस !"

"उगीच चढवूं नका मला ! तुमची निराशा झाल्याचं हें प्रांजळपणें कबूल करा !"

"निराशा ?" विश्वास उद्गारला, "कसली निराशा ?"

"माझ्याजवळ हें नाटक लपायचं नाहीं !"

"मी कांहीं नाटक करीत नाहीं; पण तूं मात्र रंगभूमीवर शोभेल अशी भाषा बोलतेस खरी !"

"तशी भाषा बोलण्यासारखंच तुमचं वागणं दिसतंय मला !"

"म्हणजे मी काय स्वगत बिगत बोलतोय कीं काय ?"

"नाहीं ! पण दुष्यंत जसं शकुंतलेला म्हणाला, "तुझा स्वीकार केल्याचं मला आठवत नाहीं तसं......"

"तिचं वाक्य पुरं होण्याच्या आंत विश्वास उद्गारला, ए उगीच मला दुष्यंत बनवू नकोस. माझी शकुंतला मला अशी जवळ पाहिजे...!"

विश्वासनें विनोदिनीला आपल्या जवळ ओढलें. त्याच्या त्या प्रेमाकर्षणानें तिला आंतल्या आंत गुदगुल्या झाल्या.

"लग्नाआधीं तुम्हीं काय म्हणाला होता ?" तिनें मुद्दा सोडला नाहीं.

"काय ?" तो मुद्दामच तिला वेडावल्यागत बोलला आणि त्यानें तिची हनुवटी पकडली.

त्याचा हात तिनें बाजूला केला. "तुला माझ्या दुकानाच्या कामांत मदतनीस व्हावं लागेल" असं तुम्हीं म्हणाला होता. आठवतं कां ?"

"हो—पूर्ण आठवतं; पण तेव्हां मी तुझ्याशीं दुरून बोलत होतों. तुला अशी अगदीं जवळ केलेली नव्हती. मला फक्त श्री माहीत होती—अन् तिच्या नादांत मी होतों !"

"मग अजून तुम्हीं तिच्या नादांत नाहीं असं तुम्हांला वाटतं कीं काय ?"

"नाहीं, तसं कसं वाटेल मला ? श्रीच्या नादात मी असतो दिवसा पण ! रात्रीं कुणाच्या नादांत असतो सांग !"

"इश्श !" विनोदिनी उद्गारली, आणि तिनें त्याच्या दंडाला चिमटा काढला.

तो चिमटा म्हणजे त्याला जणूं सूचनाच होती ! त्यानें तिला आपल्या हृदयाशीं घट्ट धरलें आणि प्रेमभावनेनें तिच्या मुखाचीं अनेक चुंबनें घेतली.

"नाहीं, खरंच सांगतें—तुमच्यावरचा कामाचा ताण कमी करावा अशी माझी इच्छा आहे ....."

"ती व्यवस्था करीत आहे मी..."

"कशी ?"

"कारखान्याकरितां एक स्वतंत्र मदतनीस नोकरीवर घेण्याचा विचार करतोय मी. ...."

"म्हणजे माझं काम तुम्हांला पसंत पडत नाहीं ?"

"तुझं काम मला पूर्ण पसंत आहे ! अन् म्हणूनच दुसऱ्या Section मध्यें तुझी बदली करणं मला पसंत नाहीं. तूं घर इतक्या उत्तम तऱ्हेनं Manage करशील अशी मला कल्पना नव्हती; म्हणून मी तेव्हां दुकानांतल्या कामाचं मुद्दामच सूतोवाच करून ठेवलं होतं. इकडची कसर तिकडे कशी काढावी हें व्यापाऱ्याला कोणी शिकवावं लागत नाहीं."

"दुकानांत येऊन काम करण्याची अलीकडे मला हौस वाटूं लागली होती !" ती मुद्दामच म्हणाली.

"मी जेव्हां नुसताच व्यापारी होतों, तेव्हां मलासुद्धां वाटत होतं—लग्न झाल्यावर बायकोलासुद्धां आपल्या कामांत सहभागी करावं; पण प्रत्यक्ष लग्न झाले; अन् घराची, संसाराची अन् तुझ्यासारख्या बायकोची मला अशी कांहीं निराळी चटक लागूं लागली कीं, तुला रुपये, आणे, पैच्या व्यापारी जगांत ओढणं मला अनुचितच नव्हे, तर अगदीं अप्रयोजकपणाचें, अरसिकपणाचें वाटूं लागलें. नवऱ्यानें बायकोला कुठं ओढावी ह्यालासुद्धां कांहीं संकेत आहेच कीं ! माहीत आहे का तुला तो संकेत ?"

"वात्रट आहात अगदीं !" त्याला आणखी एक चिमटा काढून ती म्हणाली !

●●●

अनुक्रमणिका






[ पान २६ वरून—नाना शंकरशेट ]

कित्येक वर्षें होता. तसेंच पाहिले तर नानांची आपल्या सार्वजनिक अथवा राजकीय कार्याला प्रारंभ अगदीं अल्पवयांतच केला. कारण सतीची चाल वंद करावी म्हणून जो असंख्य सह्यांचा अर्ज ब्रिटिश सरकारकडे मुंबईहून करण्यांत आला त्यावर नानांनी आपले वय अवघे एकोणीस वर्षांचे असतांनाच सही केली होती. भारताचे तत्कालीन लाटसाहेब विल्यम बँटिक यांनीं हिंदुसमाजांतील ही सती जाण्याची रूढि १८३९ त वंद करून टाकली हे आतां इतिहासांत नमूद झालेलें आहे.

नाना शंकर शेट यांची दृष्टि चौफेर होती. नव्या जमान्यांत एत्‌द्देशीयांनीं मागें न पडतां पाश्चात्य विद्यांत प्राविण्य संपादावें व आपले पौरस्त्र संस्कृति धनहि संभाळून ठेवावें असें त्यांचे समन्वयवादी विचार होते. मुंबईंत वेस्टर्न इंडिया व मर्कंटाईल या वँका युनियनांच्या सहकार्यानें त्यांनींच काढल्या व पहिलीमधें ते व जमशेटजी डायरेक्टरहि झाले. जुन्या मुंबानगरींत कापडाच्या गिरण्या युरोपियन, पारशी व गुजराथी भांडवलानें सुरू झाल्या असें समजतात. परंतु सुरुवातीला कित्येक महाराष्ट्रीयांनींहि या गिरण्याच्या भांडवलांत कांहीं भाग घेतले होते. नानांनीं तर बऱ्याच गिरण्यांच्य भांडवलांत कांहीं भाग घेतले होते. घाटमाथ्यावरील गोदावरी, कृष्णा, भीमा, प्रवरा, नीरा वगैरे नद्यांना बंधारे घालून कालवे काढून जमीन भिजविणाऱ्या योजना त्यांनींच कल्पिल्या नि सुचविल्या होत्या. तसेंच समुद्राला विशेषत: बॅकवेला मागें हटवून जमीन तयार करवून मुंबापुरीचा विस्तार शक्य तेवढा वाढवावा अशीहि त्यांची खटपट होती.

कै. नाना शंकरशेट हे मोठे धार्मिक वृत्तीचे होते. ते शंकराचे अनन्यभक्त होते. त्यांनीं ग्रँटरोडला एक शिवालय वांधून त्याची नीट व्यवस्था करून ठेवलेली आहे. मुंबई शहराची व्यवस्थित वाढ होण्याच्या दृष्टीनें नगरपालिकेची स्थापना करण्यासाठीं नानांनी त्यावेळीं झटून प्रयत्न केले. मुंबईतील प्रेक्षणीय स्थळें म्हणून ज्याचा उल्लेख केला जातो ती राणीची बाग व तेथील आलबर्ट एडवर्ड पदार्थ संग्रहालय यांचे उद्‌घाटन तर नानांच्याच शुभहस्तें तत्कालीन राज्यपालांच्या कारकीर्दीत करण्यांत आले होते. या एकाच घटनेवरून जनतेंत व सरकार दरवारांत त्यांना किती मान होता याचा प्रत्यय येतो.

१८५७ सालीं जे स्वातंत्र्य समर झाले त्याच्याशीं नानांचा प्रत्यक्ष संबंध जोडून वंडवाल्यांना ते सामील होते किंवा त्यावद्दल नानांची सहानुभूति होती असें संशय कितीतरी ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं घेतले होते. परंतु ते विनवुडाचे नि निराधार होते. त्यामुळें त्यांतून कांहींच निष्पन्न झालें नाहीं. न्यायमूर्ति रानडे यांजवरसुद्धां क्रांतिवीर वासुदेव वळवंत फडके यांच्या वंडाला सहानुभूति दाखविल्याचा संशय तत्कालीन राज्यपाल सर रिचर्ड टेंपल यांनीं घेतला होता व त्यामुळें त्यांची पुण्याहून धुळ्याला तडकाफडकी वदली केल्याची हकीकत सर्वश्रुतच आहे. अनेक लोकधुरीणांना असल्या दिव्यांतून जावे लागलेले आहे. आणि राज्यकर्ते परकी असले कीं, हा प्रकार कांहींसा स्वाभाविकच म्हटला पाहिजे. पुन्हां १८६२ सालीं नानासाहेब पेशव्यांना उठविण्याच्या कामीं त्यांची मदत होती असा एक संशय त्यांच्यावर घेण्यांत आला. त्यावेळीं तर संशय घेणाऱ्यांना नानांची अखेरची माफी मागावी लागली. या दोनहि वेळीं तत्कालीन राज्यपाल लॉर्ड एलफिन्स्टन व सर वार्टल फ्रियर यांना कळून चुकलें कीं, नाना उत्पाती, उपद्रवी, उपद्‌व्यापी गृहस्थ मुळींच नाहींत; तर ते ब्रिटिश अंमलामध्येंच आपल्या देशाचें हित साधणारे, नव्हे साधूं पहाणारे व्यवहारी दृष्टीचे देशभक्त आहेत. स्त्री शिक्षण, वरिष्ठ हिंदु जातींतील विधवांच्या पुनर्विवाहावरील बंदी उठविणें इ. सुधारणांचेहि नाना पुरस्कर्ते होते.

अशा या अव्वल इंग्रजी अमदानींत, उच्चपदास जनप्रियतेस पोचलेल्या व लोकोपयोगी कार्यांत गुंतलेल्या व देशाचें हित साधणाऱ्या थोर देशभक्तास त्याच्या या मृत्यु शताब्दीनिमित्त स्वतंत्र महाराष्ट्रांतील साऱ्यांचे कोटी कोटी प्रणाम ! ● ● ●

---

[ पान १८ वरून--कांहीं क्षण... ]

खाटमांडूहून एका रिपोर्टरजवळ आधींच पाठविलेला निरोप–
"सोलाची कढी, भात व तळलेले मासे हवेत !" आज खास तोच वेत. लालाचं आवडीनें जेवण, बऱ्याच दिवसांत असलं कुठं मिळायला? "लाला, ती आंब्यांची फोड खा !"
"मग घेतो ना–"
"नाहीं लाला, आईनें ह्या मोसमांत अजून आंवा खाल्ला नाहीं. तूं सुखरूप येऊन आंवा खाईपर्यंत आपण खाणार नाही अशी शपथ घेतली होती तिनं देवापाशी !"
लाला आंव्याची फोड तोंडांत टाकतो व आईला आग्रह. आनंदातिशयानें तिच्या भावना उचंवळून आलेल्या. ती फोड जराशी उष्टावते व मग खाईन असं म्हणते.
सकाळीं विमानतळावर हाच प्रकार. लालाला आलिंगन देतांना दोन दिवसांपूर्वी दवाखान्यांत एका पेशंटने अविचारानें लालाच्या वडलांवर केलेला प्राणघातक हल्ला आठवतो. केवळ चमत्कार म्हणून "हे" वांचले. काळ आला होता पण वेळ आली नव्हती. देवा मंगेशाच्याच कृपेनें आजचा दिवस दिसला. आणि कृतज्ञतापूर्वक देवाचं स्मरण करत असतानाच तिच्या डोळ्यांतून गंगायमुना वाहूं लागतात.

* * *

**काळ : ८ जून १९६५ स्थळ : मुंबई वेळ : रात्रीच्या जेवणाची.**
"बावा, माझ्या सत्काराला कोण मंत्री बोलावणार असं ऐकलं ?"
"कांहींतरी खटपट चालली आहे खरी त्या मंडळीची !"
थोडी स्तब्धता.
"पण एवढा थाट हवा कशाला ? छोटासाच घरगुती समारंभ झाला असता म्हणजे वरं झालं असतं !"
"त्यांची इच्छा असली तर होऊं दे कीं त्यांच्या मनासारखं !"
"मला पटत नाही हे बावा. सुरवातीला मी नकार दिला तो ह्याच कारणासाठीं. आमचं यश हे team spirit चं होतं. माझा योग्य तो वांटा मी उचलला एवढंच. मग सत्कार कशाला ? फारच गळ घातली म्हणून मी लहानशा समारंभाला नाईलाजानें संमती दिली होती."
परत स्तब्धता.
"बावा तुम्ही त्यांना सांगा. नाहीतर मी सांगेन उद्यां..."
"नको, तूं नको सांगूस. मी फोन करीन उद्यां. लाला तुझ्या दृष्टीनें ही लहानशी गोष्ट असली तरी लोकांना त्याची फार अपूर्वाई वाटते. तुझं यश फार मोठं आहे. अभिमान वाटण्याजोगं. तुझं नशीब थोर म्हणून असं दुर्मिळ यश मिळालं तुला. सारेजण तुझं कौतुक करताहेत तर तुझा विरोध कां ?..."
वराच वेळ शांतता.
रेंगाळत जाणारा हा संवाद. पांच वर्षांपूर्वीची आठवण करून देणारा. आज समजूत पटत नव्हती मुलाची. नि समजूत घालत होते त्याचे वडिल !

● ● ●







# माझी ट्रकची निवड ? अर्थात् फार्गो



भैया, दिर्घकाल ट्रक चालविण्याच्या अनुभवानें माझी खात्री झाली आहे कीं फार्गो ट्रकांच्या उत्कृष्टते-बद्दल दोन मतें असूंच शकत नाहींत. उदाहरणार्थ ॲक्सल्स घ्या ना. फार्गो गाडीला " टिमकेन " ॲक्सल्स लावलेलीं असतात. आतां त्याना "रोकवेल स्टॅन्डर्ड" या नांवानें ओळखतात आणि तीं उत्कृष्ट म्हणून सर्व जगभर सुप्रसिद्ध आहेत. प्रचंड वजन वाहून नेण्याची शक्ति असलेलीं हीं ॲक्सल्स इतकीं चांगली आहेत कीं आम्हां ट्रक चालविणाऱ्यांना त्यांच्यावर संपूर्णपणें विसंबून राहतां येतें. या दृष्टीनें त्यांचें आम्हांला फारच महत्व वाटतें.

याशिवाय आणखी इतर कितीतरी उच्च दर्जाचीं वैशिष्ठ्यें आहेत तीं सर्व एकत्र केलीं कीं त्यांपासून निष्कर्ष एकच निघतो. तो म्हणजे फार्गो हा एक महान ट्रक आहे हा होय. वजन वाहून नेण्याच्या शक्तींत, टिकाऊपणांत पैसे कमविण्याच्या सामर्थ्यांत अशा सर्व बाबतीत तो महान आहे. माझी खात्री आहे, तुम्हीही यापुढें फार्गो ट्रकच वापराल.



## फार्गो डीझेल ट्रक

निर्माते: दी प्रीमियर ऑटोमोबाइल्स लिमिटेड, मुंबई

MAR SISTA'S-PAL-406

**आपल्या नजीकच्या विक्रेत्याकडे चौकशी करा**



अनुक्रमणिका






## महाराष्ट्राचा "माणूस" मुख्यमंत्री !

**योग्य** जागीं, योग्य कामीं योग्य माणसें लाभणें, त्यांच्या कर्तृत्वाची वूज राखून त्यांची योग्य जागीं नियुक्ति होणें. त्या संधीतून त्यांचे कर्तृत्व उजळून निघणें. त्यांतून नवा विश्वास उत्पन्न होणें. त्या विश्वासाचें सार्थक होणें ह्या गोष्टी अलिकडे फार कमी आढळून येतात. त्यामुळें असा दुग्धशर्करा योग जमून आला कीं, माणसाला बरें वाटतें. राजकारणांत असे योग जमून येणें अधिकच दुर्मिळ असते त्यामुळें तिथें असे घडलें कीं, मानस प्रमदित होते.

सांप्रत महाराष्ट्र प्रांतीं मुख्यमंत्रीपदीं विराजमान झालेल्या ना. वसंतराव नाइकांचे बाबत असा दुग्धशर्करा योग घडून आलेला आहे हें नमूद करण्यांत आम्हांस बहुत आनंद वाटतो. कै. मारोतराव कन्नमवार ह्यांच्या निधनानंतर अगदीं अचानकपणें एक नांव जनतेसमोर आलें. (निदान इकडच्या तरी) मोरारजी जाईपर्यंत जसें चव्हाणांचे कर्तृत्व हें सर्वसामान्य जनतेला अज्ञातच होतें. तसेंच कन्नमवार जाईपर्यंत वसंतराव नाईकांचें नांव ( व कर्तृत्वही) जनतेला अज्ञातच राहिलें. नाईक आल्याबरोबर पहिल्याच फेरींत नाईकांनीं एक नवा पायंडा पाडला. आणि आपल्या स्वयंकर्तृत्वाची छाप पाडली. सीमा सत्याग्रहींचा मोर्चा काळ्या घोड्यापाशीं आला (व अडविला गेला) त्याला नाईक सामोरे गेले. मंत्री आपली खुर्ची सोडून जनतेला भेटला. त्यावेळीं 'पुंडलिका भेटीं परब्रह्म आलें' म्हणून त्यांच्या ह्या कृत्याचा गौरव झाला. गोव्याच्या प्रश्नावर महाराष्ट्र विधानसभेनें मंजूर केलेला ठराव हें एक आणखी धाडसी पाऊल होतें. सीमा प्रश्नाबाबतची वारंवार व्यक्त केलेली तीव्र प्रतिक्रिया, महाराष्ट्राच्या न्याय्य मागण्यांबाबतचा कठोर, निश्चयात्मक आग्रह हीं आणखीं कांहीं वैशिष्ट्यें ! आणि अगदीं अलिकडेच—अन्नधान्यविषयक प्रश्नांबाबत त्यांनीं घेतलेली रोखठोक, स्वच्छ व स्पष्ट भूमिका ह्या मुळें तर नाईकांचे वेगळें 'मेटल' सिद्ध झालें आहे. नाईकांच्या व्यक्तित्वांत हें जें "विष्णुदास" पण आहे तेंच त्यांच्या यशस्वी कारकीर्दीचें गमक आहे असें मला वाटतें. विरोधी पक्षांतल्या सदस्यांशीही नाईक मोकळेपणानें वागतात. कारण मतें भिन्न असली तरी "माणूस" एक आहे ही त्यांची श्रद्धा आहे. त्या श्रद्धेतूनच त्यांनीं मुख्यमंत्री होतांच विरोधी पक्षाच्या राजबंद्यांची मुक्तता केली. दारुबंदी विषयक प्रगत व व्यावहारिक दृष्टिकोन स्वीकारून व तो अंशतः कार्यान्वित करून वसंतरावांनीं 'राजनैतिक' दृष्ट्या आपण किती 'धाडसी' आहोंत हें सिद्ध केलें आहे. अलिकडेच त्यांनीं रायगड सिंहगडला भेटी दिल्या व झोंपड्यांतल्या 'माणसां' शीं जवळचे नातें जोडलें. पण हा व्यवहार त्या जागेचीं माणसें करतात, त्यांना करावा लागतो असेंही कुणीं म्हणतील. पण वसंतरावांचें तसें नाहीं. ते स्वतः एकूण शेतकरी जीवनाशीं समरस झाले आहेत. ते हाडाचे शेतकरी आहेत. **वसंतराव फुलसिंग नाईक** हे पुसद तालुक्यांतील गहुली गांवचे रहिवासी ! वसंतरावांच्या आजोबांनीं शेतीच्या जोडीला सुतार कामाचा धंदा केला आणि त्यांतून जमीन खरीदली. वसंतरावांच्या वडिलांनीं शेतींत खूप मेहनत केली आणि उत्तम शेतकरी व लोकोपयोगी गृहस्थ म्हणून नांव कमावलें. वसंतरावांचे बंधु बाबासाहेब (राजुसिंग) नाईक हे वसंतरावांच्या जडणघडणीचे प्रमुख शिल्पकार ! आज तेही शेती व कौटुंबिक जबाबदाऱ्या संभाळून कॉंग्रेस कार्य करीत आहेत. सर्व प्रश्न सामोपचारानें मिटविणें हा नाईक कुटुंबाचा 'स्वभाव' आहे. अशा "माणसांत" वसंतराव घडले आहेत. वकिली चालूं असतांनाही 'शेतकरी' ही भूमिका ते विसरले नाहींत. आणि म्हणूनच मंत्री झाल्यावर त्यांनीं शेतीसंबंधींचे विविध ज्ञान मिळविलें—विशेषतः गेल्या ३–४ वर्षांत द्राक्ष लागवडीबाबत त्यांनीं माहिती मिळविली व आज गहुली व थेलू येथें त्यांनीं द्राक्षांचे मळे उभे केले आहेत. कुठल्याही प्रश्नाची मूलगामी चिकित्सा करणें हा त्यांचा स्वभावविशेष आहे. ते स्वभावानें खुले आहेत. शांतपणें म्हणणें ऐकून घेणें. त्याचा सर्वांगीण विचार करणें आणि घोळ न घालणें ही नाईकांची 'राजनीति' होय ! महाराष्ट्रांतल्या सहकारी चळवळीचे मोठेपण त्यांनीं जाणलें आणि ज्वार खरेदीसारखी एक मूलभूत महत्वाची योजना त्यांनीं कार्यान्वित केली. अविवाद्य असें जगांत कांहीं नाहीं. कार्याचें मोठेपण तें सुचण्यांत, तें कार्यान्वित करण्यांत सिद्ध होत असते. नाईकांच्या कल्पनेचे व धाडसाचे कौतुक केलेच पाहिजे. राहुरीला, मुंबईला




अनुक्रमणिका

त्यांनीं चढविलेला हल्ला हा कांहीं 'केंद्रा' वरचा हल्ला नव्हता. तर एका विशिष्ट मनोवृत्तीवरचा होता. त्यामध्यें स्वतःचें मोठेपण मिरवायचें नव्हते तर तळमळ होती—जनतेबद्दलची आणि पक्षाबद्दलचीही! नाईकांची भूमिका (अन्नविषयक) मूलगामी होती. आणि तिला पांच राज्यांनीं पाठिंबा दिला. नाईकांना 'शो' आवडत नाहीं. त्यामुळें 'गांधी टोपी' न घालूनही ते कट्टर कॉंग्रेसमन राहूं शकतात. त्यांची प्रसिद्ध 'पाईप' त्यांच्या जनसेवेत आडवी येत नाहीं. अशा तऱ्हेचा 'विष्णुदास' मुख्यमंत्री महाराष्ट्राला लाभला आहे. धीराचा, स्पष्ट बोलणारा, क्रियाशील, कल्पक, व्यवहारी, संयमी व समंजस असा मुख्यमंत्री असल्यानें आपले 'अन्याय' आतां दिल्लीदरबारीं बोलूं लागले आहेत. त्यांची 'तड' लागेल असा विश्वास बाळगून मुख्यमंत्र्यांना आपण सुयश चिंतूंया.

## सौंदर्यवादी समीक्षक—प्रा. श्री. के. क्षी.

**दिल्लींत** मामा, काकांची वर्दळ होती तोंपर्यंत महाराष्ट्राचा आवाज तिथपर्यंत पोहोंचत होता. महाराष्ट्रीय साहित्यिक व राजकारणी ह्यांना मोठा दिलासा होता. काका दिल्लीहून परतले. आणि मामा परतलेच नाहींत. त्यांनीं दिल्लींतच जीवनयात्रा संपविली. त्यानंतर 'राजकारणी' यशवंतराव दिल्लींत पोंहचले. पण साहित्यिक मामांची जागा मात्र रिकामी राहिली होती. ती जागा नुकतीच भरली. एका चांगल्या माणसाच्या नेमणुकीनें भरली हें बहुत आशादायक ! **श्री. के. क्षी.** हें नांव महाराष्ट्राच्या सामाजिक व साहित्यिक क्षेत्रांत सुपरिचित आहे. कारण वृत्तपत्रें, मासिकें यांतून मौलिक स्वरूपाचे कितीतरी विचार क्षीरसागरांनीं आजवर मांडले आहेत. 'सौंदर्यवादी' भूमिकेंतून ते जीवनाकडे व साहित्याकडे पहात असल्यानें त्यांच्या लेखनांतून नवसाहित्यांतल्या एका अनिष्ट प्रवृत्तीबद्दल सहाजिकच कडवट टीका येते. 'अश्लीलते'च्या संदर्भात क्षीरसागरांचे नांव अलिकडे वारंवार ऐकूं येते. कारण तीही समाजाचें आरोग्य बिघडविणारी एक असुंदर प्रवृत्ति आहे असे ते मानतात. वाङ्मयांत मतांना आणि मतभेदांनाही नेहमींच वाव असतो. त्यामुळें क्षीरसागरांची सारींच मतें सार्‍यांना पटतील असें नाहीं. पण क्षीरसागरांची टीका मूलगामी, पूर्वग्रहरहित, स्वतंत्र असते हें मान्य करावेंच लागेल. क्षीरसागरांनीही 'साहेब' वाचला—पचविला आहे. आणि तरीही क्षीरसागर परान्नपुष्ट वा पर-दास झाले नाहींत. कितीतरी मौलिक व नवीन विचार त्यांनी मराठीला दिले आहेत. मागें इंदूरला साहित्य सभेचें जें अधिवेशन झाले त्यावेळीं त्यांनीं मांडलेला एक विचार मला अजून स्मरतो. इंग्रजी राज्य गेल्यानंतरही राजदरबारी अजून जे 'इंग्रजी' रीतिरिवाज चालू आहेत त्याबद्दल त्यांनीं खेद व्यक्त केला होता. मीराबाईवरचे त्यांचे लेखन असेंच मनोज्ञ आहे. मध्यंतरी विवेकानंदांवर त्यांचें व्याख्यान झाले त्यांतही ही बुद्धिनिष्ठ चिकित्सा दिसून आली. त्यांचे अखंड वाचन, मनन व चिंतन चालूच असते. वर्षानुवर्षे प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें ते रोज सकाळीं फिरायला जात. गोपीनाथ तळवळकर व श्री. के. क्षी ! त्यापायीं त्यांनीं सांसारिक जीवनहीं स्वीकारलें नव्हते. नंतर स्वीकारलें. कांहीं वर्षे संसार केला आणि आतां पुन्हां ते एकटे आहेत. पण अजूनही समोर येतात ते 'साधक' क्षीरसागरच ! प्रवाहा विरुद्ध ताठपणें उभें रहायला निष्ठा लागते. मनोधैर्य लागते. स्थिर बुद्धि लागते. कार्य, तत्वज्ञानावर अविचल श्रद्धा लागते. क्षीरसागरांजवळ हे सारे गुण आहेत. आणि म्हणूनच साहित्य अकादमीवरची त्यांची निवड योग्य व अभिनंदनीयही आहे. आम्हीं क्षीरसागरांचे व दिल्लीदरबारच्या गुणग्राहकतेचेही अभिनंदन करतो.

**—आदित्य**

## एव्हरेस्ट पंचांग !

[दुसऱ्या महायुद्धापूर्वीच्या सर्व एव्हरेस्ट मोहिमा उत्तरेकडून किंवा तिबेटमार्गे झाल्या. त्यानंतरच्या सर्व मोहिमा मात्र दक्षिणेकडून म्हणजे नेपाळच्या बाजूनें झाल्या.]

**१८५२** श्री. राधानाथ सिकदार, चीफ कॉम्प्युटर ऑफ इन्डिया, ह्यांनीं अनेक प्रमेयांनीं शिखर नं. १५ हे हिमालयाच्या कुशीतीलच नव्हे तर जगांतील सर्वोच्च शिखर आहे असं सप्रमाण सिद्ध केलें. त्यावेळचे सर्व्हेअर जनरल ऑफ इन्डिया, सर जॉन एव्हरेस्ट, ह्यांच्या नांवानेंच ह्या शिखराचं बारसं करण्यांत आलं.

**१९२१** ब्रिटीशांची नॉर्थ कोलसाठीं पहाणी. सुमारें २३,००० फूटांपर्यंत प्रगती.

**१९२२** प्रथम सर्वंकष ब्रिटीश तुकडीची मोहिम. २७,३०० फूटांपर्यंत मजल. गिर्यारोहणांत ऑक्सिजनचा प्रथमतःच उपयोग.

**१९२४** ब्रिटीश मोहिम. २८,००० फूटापर्यंतचा पल्ला. ह्यांतील जी. एल्. मेलोरी व अॅण्ड्र्यू आर्यावन हे सभासद बेपत्ता.

**१९३३** पुनःश्च ब्रिटीश मोहिम. पुन्हां २८,००० फूटांपेक्षांही अधिक उंचीवर चढाई.

**१९३४** मॉरिस विल्सन ह्या ब्रिटीश माणसाचा एकाकी प्रयत्न. नॉर्थ कोलच्या खालीं त्यांचे देहावसान.

**१९३५** ब्रिटीशांची नॉर्थ कोलसाठीं पुनः पहाणी.

**१९३६** ब्रिटीश मोहिम. कोलच्या जराशा उंचीवरून खराब हवामानामुळें माघार.

**१९३८** ब्रिटीश मोहिम. २७,००० फूटांपर्यंत जाण्यांत यश.

**१९४७** अर्ल डेनमन ह्या कॅनेडियन इसमाचे एकाकी साहस. नॉर्थ कोलच्या जवळ जाऊन शरणागती.

**१९५०** प्रथमतःच एव्हरेस्टकडे दक्षिणेकडून शिरकाव. एच. डब्ल्यु. टिलमन व चॉर्लस होस्टन ह्यांचे खुम्बू हिमखंडाच्या पायथ्यापर्यंत आरोहण.

**१९५१** (अ) ब्रिटीशांची दक्षिणेकडे टेहळणी मोहिम. हिमखंडाच्या माथ्यावर Western Cwm (वेस्टर्न कुम्)च्या प्रवेशद्वारापर्यंत टप्पा गांठला.

[पान ७० वर]








[ पृष्ठ १५ वरून–मुलाखत ]

त्यांचं ऋण फेडण्यासारखं नाहीं. त्यांच्या कामगिरीचा गौरव करण्यासाठीं इंग्रजी भाषेत जेथें जेथें Sherpa हा शब्द येतो तेथें S हा कॅपिटल काढतात ! They don't act as porters. They are treated as our colleagues. बॅटमन हे सुद्धां शेर्पाच असतात. फक्त High Altitudes ला शेर्पा भारवाहक म्हणून काम १७८०० फुटावर करतात. त्यांचीं कामें दोन आणि तीही महत्वाची! एक Load carriage व दुसरें Route ठीकठाक ठेवणें. १७८०० फुटांखाली ते सामान वाहणाऱ्या हमालांवर लक्ष ठेवतात.

प्र.:–शेर्पांशिवाय एव्हरेस्ट मोहीम अशक्य आहे असें आपणांस वाटते काय?

डॉ.:–अशक्य नाहीं. पण फार कठिण आहे असें मात्र मला वाटतें. त्यांची Load carrying ची capacity फार मोठी आहे. If emergency arises, they can carry the human load also !

प्र.–केवळ शेर्पांचीच टीम एव्हरेस्ट मोहिमेवर गेली तर एखादे All time record करूं शकेल असें आपणांस वाटतें काय?

डॉ:–करूं शकतीलही ! अहो, हीं मंडळी २६,००० फुटापर्यंत ऑक्सिजनशिवाय जाऊं शकतात. २८,००० फुटावर सुद्धां Load वर नेतांना ऑक्सीजन घेत व इच्छित स्थळीं सामान व ऑक्सिजन टाकून परत येत. त्यामुळें तो ऑक्सिजन Summitters ना वापरतां येतो. त्यांची Capacity भलतीच दांडगी आहे. त्यामुळ विक्रम करतील असें वाटतें.

प्र:–काय हो, ह्या शेरपांना पैसे वगैरे द्यावे लागत असतीलच.

डॉ:–हो तर ! त्यांना Daily Basis वर पैसे देत असूं. दर दिवसाला ८-१० नेपाळी रुपये ह्या हिशोबानें पैसे देत असूं. याशिवाय बक्षीसी वेगळी असे. साऊथ कोलला गेलें कीं, १०० रु. बक्षीस असे. ४४ पैकीं ४१ शेरपा साऊथ कोलवर आले होते. एका शेरपाला ५ वेळां हे बक्षीस मिळाले.

प्र:–म्हणजे प्रत्येक शेरपाला हजार दोन हजार रुपये मिळाले असतील ?

डॉ:–अगदीं सहज !

प्र:–या मोहिमेवर जाण्यापूर्वी देव, दैव वगैरे श्रद्धा मनांत वाळगून आशिर्वाद मागून तुम्हीं सारे गेलां असालच.

डॉ:–मी स्वतः फारसा धार्मिक प्रवृत्तीचा नाहीं. माझी नास्तिक म्हणून गणना करायला हरकत नाही. त्यामुळें मी देवाचे फोटो वगैरे कांहीं नेले नव्हते. मंगेशाचा एक फोटो माझ्या बायकोनें माझ्या सामानांत ठेवून दिला होता. **सोनम ग्यात्सो** हा आमच्यांतला सर्वांत 'पायस' माणूस. सर्व मोहीमेंत तो Prayers करीत जात असे. prayer flags रोवून, प्रार्थना करून तो पुढें जायचा. ते flags त्यानें जगांतील 3rd Important Lama कडून bless करून आणले होते. Prayer Wheel पण त्यानें आणल्या होत्या. वारा बंद करण्यासाठीं, बर्फ बंद करण्यासाठीं अशी त्यांची निरनिराळीं Prayer wheels होती ! प्रत्येकानें आपापल्या युनिटचे, क्लबचे flags आणले होते. शिखांनीं गुरु नानकाचे फोटो आणले होते. मी मंगेशाचा फोटो नेला होता. पण open prayers मात्र मी कधीं केल्या नाहींत.

प्र:–ह्या देव दैवाबाबतचे कांहीं गंमतीदार अनुभव ?

डॉ:–माझ्या जवळचा मंगेशाचा फोटो एकदां गहाळ झाला होता. वास्तविक मी आत्यंतिक धार्मिक प्रवृत्तीचा नाहीं तरीही तो फोटो सांपडेपर्यंत मनाला अस्वस्थता वाटत होती. मी पत्नीला लिहिलेल्या पत्रांत तसें लिहिलेही. पुढें तो बी. पी. सिंग ह्यांनीं मला आणून दिल्यावर खूप वरें वाटले! तसेंच पहिला प्रयत्न अपेशी ठरल्यावर मी पत्रांतून pray for us for success असं माझ्या नातलगांना लिहित असे! शेवटच्या 'समिटर्स' ची निवड करतांनाही असाच गंमतीचा प्रकार झाला. नवांग गोंवू व कॅप्टन चीमा ह्यांच्या बरोबर फू दोरजी हा असिस्टंट सरदार २७९३० पर्यंत गेला होता. म्हणून बेस कॅम्पमध्यें फू दोरजीची शिखर तुकडींत योजना केल्याचें कमांडरने सांगितले. तेव्हां त्यानें आपल्या तंबूत जाऊन Yes, No च्या चिठ्ठ्या टाकल्या. प्रत्येक वेळीं No ची चिठी यायची. तेव्हां त्याने जाण्यास खळखळ दाखविली. शेवटी सर्वांनी समजूत घातली सोन्यासारखी संधी न गमावण्याची. डबल मार्च करून २६००० फुटांवर आधीच्या तिघांना गांठले. दुर्बिणीतून पहातांना शिखर तुकडींत तीनच माणसं दिसली–चार सदस्यांऐवजी. आम्ही खाली चार नांवाच्या चिठ्या टाकल्या परत कोण येत असावा ह्याचा अंदाज घेण्यासाठीं–नेमकी फू दोरजीचीच चिठी यायची! पण बेटाचें नशीब बलवत्तर–पठ्या शिखर चढून गेला! परत येणारा सदस्य होता कॅ. बहुगुणा! असाच आणखी एक श्रद्धेचा भाग! आमचे आचारी थोंडूप साहेब! तो ज्या मोहीमेंत शेवट पर्यंत राहिला त्या यशस्वी झाल्या –यापूर्वीच्या सर्व यशस्वी मोहीमांत तोच आचारी होता. १९६० मोहिमेंत त्याला अर्ध्यावरून परत यावें लागले. मोहिम अयशस्वी झाली. ५० वर्षाचा, दार्जिलिंगचा राहणारा माणूस १९५६ पासून तो आचारी, फक्त एव्हरेस्टचा आचारी म्हणून काम करीत आहे.

प्र:–१९६०–६२ च्या मोहिमा अयशस्वी झाल्या व आपली मोहीम ४ वेळां एकूण ९ माणसें एव्हरेस्टवर पाठविण्याइतपत यशस्वी झाली. ह्याची कांहीं कारण मीमांसा ?

डॉ:– They returned back on a/c of very bad Wheather. चढतांना अगदीं Razor's Sharp edge वर आपण चालत असतो. हिमवर्षाव सुरू झाला कीं, बर्फ डोक्यावर फटाफट फटके मारते. हिमअंधत्व सुद्धा येण्याची भीति असते पुढचे कांहीं दिसेनासे होतें. South Cole वर तर प्रचंड वेगानें वारे वाहतात. बर्फ उडून जाते. आम्ही सुद्धां एप्रिलमध्यें South Cole मधूनच परत फिरलो होतो. south Cole is a big place for camping—पण अतिशय वारे वाहतात. मार्गील मोहिमेंत निसर्गाची अवकृपा होती हेंच खरें!

प्र:—यंदा तुम्ही चार वेळां विजय मिळवलांत. जणू काय एव्हरेस्ट-वर 'लिफ्ट' आहे त्यांत आरामांत बसायचं नि जायचं इतकं सहज यश कसं मिळवलंत ?

डॉ:—त्याची प्रमुख कारणें—उत्कृष्ट संघनायक—He enjoyed full and active Support from us rather than obedience प्रथम दर्जाची संघभावना व सदस्यांमधील भावनात्मक सहजीवन, remarkable physical fitness . शेर्पा लोकाचं उत्स्फूर्त व संपूर्ण सहकार्य, मागल्या दोन मोहिमांचा अनुभव लक्षांत घेऊन बारीक सारीक गोष्टींचा तपशील ठरवून अत्यंत अदूरदर्शीपणानें करण्यांत आलेलं मोहिमेचं नियोजन आणि सर्वात शेवटीं Everest was kind, weather was kind, and above all God was kind हेच खरं !

प्र:—सर्वात कमीत कमी वेळ लागलेली आपलीच तुकडी आहे असें मला वाटते.

डॉ:—It's in a way true ! २६२०० फुटावर South Cole आहे. तियपासून Summit ridge सुरूं होते. तो Camp सर्वांत लवकर लावण्यांत आम्हीं यशस्वी झालो. २४ मार्चला आम्हीं प्रारंभ केला. १८ एप्रिलला आम्हीं साऊथ कोल गांठले.

प्र:—एव्हरेस्ट विजयानंतरच्या Summitters च्या feelings चे कांहीं अनुभव.

डॉ:—It's all over ! Thank God ! अशाच त्या होत्या. ग्याट्सोला मात्र आपण Nearer to God पोंहचलो आहोंत असें वाटलें.

प्र:—विजयानंतर आपण पुन्हां जावें वा जाऊं नये अशा Feelings आल्या ? आपल्याला संधि मिळाली तर पुन्हां जाल काय?

डॉ.:—I will definitely go again. गोम्बू मात्र I will never go again असें म्हणाला. पण मला वाटते कीं, थकवा गेल्यानंतर तोही म्हणेल कीं मी जातो म्हणून!

प्र.:—विजय आपण कसा काय साजरा केला?.

डॉ.:—विजय मिळाला तेव्हां आम्हीं निरनिराळया ठिकाणीं (Camp मध्ये) होतो. Every camp celebrated it in different manner. नाच, अगदी माफक प्रमाणांत मद्यपान वगैरे कार्यक्रम. त्याच रात्रीं बर्फ पडूं लागले. आमचा Mess Tent कोसळला अंगावर. त्यावेळीं मी व कॅप्टन कुमार त्यांत झोंपलो होतो. शेवटीं सुरीनें तंबूचें कापड आम्हीं कापलें आणि बाहेर आलो. सर्वजण एकत्र आल्यावर आम्हीं स्पेशल खाना घेतला. मद्यपान करणारांनी मद्यपान केले—नाच गाणीं वगैरे पद्धतीनें तो आम्हीं साजरा केला.

प्र.:—येतांना कांहीं सॉवनीयर्स आणली काय?

डॉ.:—बऱ्याचशा Summitters नी दगड आणले शिखरावरचे. कांहींना मागच्या मोहीमेवरच्या लोकांचें Ropes मिळाले ते त्यांनीं आणले. खिळे आणले. जुन्या कोऱ्या फिल्म मिळाल्या त्या आणल्या. बऱ्याच जणांनीं झेंडे नेले होते. ते त्यांनीं शिखरावर पाठवले होते. मी घड्याळ पाठवले होते. ते एव्हरेस्ट माथा पाहून आले. अहलुवालिया तर इतका Exite झाला कीं त्यानें आपलें घड्याळ शिखरावर ठेवून दिले व तो परत आला, बहुतेकांनी दगड आणले हें खरें! एकानें तर बर्फच तीर्थ म्हणून आणला.

प्र.:—कॅंपची उंची कशी ठरवली जात असे?

डॉ.:—चांगले नकाशे होते आमच्याजवळ, त्यावर Bold Land Marks आहेत. ते Visible आहेत – **अल्टिमीटर**च्या सहाय्यानें आम्हीं ती उंची मोजीत असूं.



## यशाहुनीही प्रयत्न सुंदर !

मानवाचा पहिलाच प्रयत्न सफल होणं हे भाग्य दुर्मिळ. निसर्गावर विजय मिळविण्याच्या प्रयत्नांत त्याची प्रचीती अधिक. असं असलं तरी मानवाची दुर्दम्यता कच खात नाहीं, दुप्पट आवेशाने ती उसळी मारते. "घन तिमिराहुनी चमक विजेची विरल वरी क्षणभरी" त्यावरची श्रद्धा वाढते. मग एक दिवस मनींचें स्वप्न प्रत्यक्षांत उतरते आणि मागल्या अपयशावर यशाचा कळस चढविला जातो. एव्हरेस्ट यश-यात्रेनें तावूनसुलाखून पटवून दिलेलं हे एक तात्पर्य. अपयश हा यशाचा पाया असतो म्हणून त्यांची स्मृती.....

भारतीय गिर्यारोहणाला खरी चालना मिळाली ती १९५८ सालीं हिमालयाच्या कुशींतील चो ओयु (२६,७५० फूट) हे शिखर सर केल्यानंतर. या यशांतून स्फूर्ति घेऊन भारतीयांनीं नंतरच्या काळांत अन्नपूर्णा ३, नंदादेवी, नीळकंठ, पंचचुली आणि इतर शिखरं सर केली. तरीसुद्धां भारतीय गिर्यारोहकांच्या विजिगीषु वृत्तीला एव्हरेस्ट सदैव आवाहन व आव्हानच राहिले !

### पहिले अपयश १९६०

नेते—हिमालयन माऊन्टनियरिंग इन्स्टिटयूटचे त्यावेळचे प्रिन्सिपॉल ब्रिगेडीयर ग्यानसिंग. उपनेते—१९५८ सालच्या चो ओयु ह्या यशस्वी मोहिमेचे नेते श्री. बानशाह.

दिनांक ९ मेला आंग तेम्बा व जंगलवाला ह्यांनीं साऊथ कोल (२५,८५० फूट) वर कॅम्प ६ ठोकण्यांत यश मिळविले. नंतर एकाएकीं निसर्गाची लहर फिरल्यामुळें शिखर चढाई-साठीं राखून ठेवलेल्या गिर्यारोहकांना बेसकॅम्पवर माघार घ्यावी लागली. हवामान सुधारल्यावर दोन तुकड्या शिखरावर पाठवण्यांत आल्या. पहिली २५ मेला व दुसरी दोन दिवसानंतर. सोनाम ग्याट्सो, नवांग गोम्बू व नरेन्द्रकुमार ह्या पहिल्या तुकडींतील सदस्यांनीं २४ मेला २७,६०० फूटावर, साऊथ





अनुक्रमणिका

रीजवर कॅम्प ७ ठोकला. दुसऱ्या दिवशीं झंझावाती वारे व प्रतिकूल हवामान ह्यांना न जुमानतां, मोठ्या निर्धारानें त्यांनीं २८,३०० फूट ही उंची गांठली–शिखर अवघें ७०० फूट अंतरावर ! विजयश्री लपंडाव खेळूं लागली. एकाएकीं हवेंत बिघाड झाला. आणि मोठ्या कष्टानें परतावें लागले. बेगुमानपणें उभें राहिलें तें एव्हरेस्ट शिखर—अगदीं जवळ, पण तितकेंच दूर ! दुसऱ्या तुकडींतील आंग तेम्बा, कोहली व सी. पी. व्होरा हे साऊथ कोलवर सकाळीं १० वाजेपर्यंत वर्फाची उधळण करणारे तुफान वेगाचे वर्फाचे वादळ शमण्याची वाट पहात राहिले. शेवटीं निसर्गानें मात केली. योग्यवेळीं माघार घेण्याचा निर्णय शहाणपणाचा ठरला. न पेक्षां एव्हरेस्ट टापूला मगरमिठी घालणाऱ्या पावसामुळें माघारही सहीसलामत पार पाडणं कठीण होतं !

## दुसरें अपयश १९६२

नेते–मेजर जॉन डायस (हे १९६४ मध्यें वारले) उपनेते–इन्स्ट्रक्टर- लेफ्टनंट् एम. एस. कोहली. (१९६५ च्या मोहिमेचे नेते)

अत्यंत वाईट हवामानामुळें वेस्टर्न कुम्वर चार आठवडे, ल्होत्से फेसवरील कॅम्प ५ वर एक पंधरवडा फुकट गेला. अखेरीस दिनांक २१ मेला साऊथ कोलवर तळ ठोकला. शिखर तुकडी २६ मेला साऊथ कोलवर पोंचली. पण अत्यंत खराब हवेमुळें त्यांची दोन दिवस प्रगती मंदावली. निसर्गाचें थैमान चालूंच राहिले. झंझावाती वाऱ्यानें गिर्यारोहकांच्या मार्गांत विघ्न आणण्याचा चंग बांधला. अखेरीस ह्या मोहिमेसही निराशाच पत्करावी लागली. स्वप्न आणि सत्य ह्यांत फक्त ४०० फुटांचे अंतर !

ह्या मोहिमेंतील संस्मरणीय पराक्रम:

....शिखर तुकडीतील कोहली, सोनाम ग्याट्सो व हरी डांग ह्यांनी अलौकिक धैर्यानें व निश्चयानें सतत तीन रात्रीं २७,६५० फूट उंचीवर काढल्या—त्यांतला निम्मा वेळ त्यांनीं ऑक्सिजनशिवाय काढला हें विशेष !

. . .सरदार आंग थर्के (५३) ह्यानें २७,६५० फुटावर ४० पौंड सामान वाहून नेले. त्याच्याएवढ्या वयाच्या माणसानें ह्यापूर्वी एवढी उंची गांठल्याचे ऐकिवांत नाहीं.

. . .सदस्य गुरुदयाल सिंग एक शेर्पा ह्यांचा साऊथ कोलवर सतत सहा रात्री मुक्काम—त्यांतल्या बऱ्याच ऑक्सिजनशिवाय. साऊथ कोलच्या भयंकर निर्जन प्रदेशांत रहाण्याचा उच्चांक !

....सुमन डुबे (१९) हा आतांपर्यंतच्या एव्हरेस्ट मोहिमेंतील सर्वांत लहान सदस्य. साऊथ कोलपर्यंत चढाई व तीन रात्रीं मुक्काम.

. . .कॅ. सोरेस–पथकांतील डॉक्टर–ह्यांचे सतत ४५ दिवस २१,२०० फूटावर वास्तव्य !

● ● ●

प्र.:–एव्हरेस्ट शिखर केव्हां दिसूं लागते?

डॉ.:– South Summit Advance Base कॅम्प पासून दिसूं लागते. **मणिभंजन** ह्या गावातून Vaguely दिसते. थ्यांगबोचे (१२५००) येथून शिखर चांगलेच दिसते. Setting Sun पहातां आला नाहीं.

प्र.:–एव्हरेस्टवर प्रत्यक्ष Area किती आहे?

डॉ.:–Area of about 16 sq. feet. शिखरावर बर्फमय व थोडेच खाली काळा दगड सांपडतो.

प्र.:–आपल्यावरोबर संपर्काधिकारी होता. त्याचे नेमकें काम काय?

डॉ.:–हा मनुष्य Generally member of the unit समजला जात नाहीं. युनिट व नेपाळी जनता यांच्यांतील संबंध बिघडूं नये म्हणून त्याची योजना नेपाळ सरकारनें केलेली असते– **अन्नपूर्णा ३** वरच्या मोहीमेंत सोनम ग्याट्सो व जंगलवाला यांना पळवले होते–स्थानिक लोकांनीं ! अशा वेळीं ह्या अधिकाऱ्याचा फार मोठा उपयोग होतो. Local Purchases ना त्याची मदत होते. नेपाळला ह्या मोहीमेबद्दल ५००० रु.दिले गेले. त्या संपर्काधिकाऱ्यानें लोक दुसऱ्या कुठल्या शिखरावर जात नाहींत ना हें पहायचें असते. सुर्वसाधारणपणें असले अधिकारी बेस कॅम्पमध्यें खाना, पिना और मजा करना अशा वृत्तीचे असतात. आमचा संपर्काधिकारी **भगिरथ नरसिंग राणा** (वय २३) हा आमच्यांतलाच एक झाला होता. २५००० फुटापर्यंत Oxygen शिवाय गेला पहिल्याच खेपेत ! त्यामुळें आमची Team आम्हीं १९+१ अशी न समजतां २० ची असेच मानण्यांत येऊं लागले!

प्र.:–तुम्हीं विजय मिळविल्यानंतरच्या भारतीयांच्या कांहीं स्फूर्त प्रतिक्रिया?

डॉ.:–आमच्या विजयाची बातमी कळल्यानंतर आम्हांला अनेक अभिनंदनपर संदेश व भेटी आल्या. हे संदेश एकत्र गोळा करण्यांत येऊन रात्रीच्या वेळीं सर्वजण एकत्र जमले असतांना वाचण्यांत येत असत. त्यांतला एक गंमतीदार प्रसंग–एका महाराष्ट्रीय माणसानें एक Inland Letter आमच्या कमांडरला लिहिलें. तो इतका भावनावश झाला कीं २ पान भरून त्यानें कोहलींना काय संबोधायचें ह्या संबंधीचे विचार लिहिले आहेत. व ५-६ ओळींत त्यानें अभिनंदन केले. तारा येत. एकानें मला ताडपत्रावर पत्र लिहून पाठविले. त्या महाराष्ट्रीय माणसाचें पत्र वाचून कोहली व इतरेजन म्हणाले "See how sentimental your Maharashtrians are !" त्यानंतर मग एका पंजाबी माणसांचें पत्र आले आठ दिवसानीं त्यांत तोच प्रकार होता. मी मग पंजाबी माणसांबद्दल तोच अभिप्राय परत केला. आम्हीं परत यायला निघाल्यानंतर माझ्या पत्नीनें खांटमांडूला येऊन भेटायचे ठरले. माझ्या आईनें देवाजवळ कांहीं पेढे ठेवून ते बायकोजवळ पाठवून दिलें. व मीं तें साऱ्यांना वांटावे असा निरोपही धाडला. त्याचवेळीं माझ्या मित्रानें आजच्या








युगाला साजेशी विजयी वीरांना भेट म्हणून लिकर चॉकलेटस् वायकोबरोबर पाठवली. मी मद्यपान करत नसल्यामुळें ती चॉकलेटस् नकळत तरी मी खावी ही सुप्त इच्छा! पण गंमत अशी कीं खाटमांडूला पेडे तेवडे सुखरुप आले व लिकर चॉकलेट्सना मात्र वुरशी आली!

प्र.:–एकमेकांचा निरोप कसा घेतला?

डॉ.:–शेरपा खाटमांडूला राहिले. तो निरोप फार हृद्य होता. कांहींच्या डोळ्यांत पाणी आले. मग आम्हीं त्यांना कांहीं भेटी दिल्या. औषधें वांटून टाकली. कपडे, स्वेटर्स दिले. आम्ही मग दिल्लीला आलो. आणि पांगलो. भावनांचा कल्लोळ टाळण्यासाठीं निरोप असा आम्हीं घेतलाच नाहीं.

प्र.:–ऑक्सीजनशिवाय एव्हरेस्टवर जाणें कितपत शक्य होईल? रात्रीं निजतांना Oxygen घेत होतां?

डॉ.:–Oxygen शिवाय एव्हरेस्टवर जाणें कठिण आहे असें समिटर्सचें मत आहे. पांच पावलें सुद्धां टाकणें जड जातें. प्रत्यक्ष शिखरावर दोनच माणसें उभीं राहूं शकतात. रात्रीं आम्हीं Oxygen वापरीत होतो. प्रमाण १ ते २ लिटर Per minute असें असे. साधारणपणें ५० मिनिटापर्यंत Oxygen-शिवाय राहतां येतें

प्र.:–'मूर्तिमंत भीति उभी' असे कांहीं अनुभव आले?

डॉ.:–एकदां Ladder उभी केली असतां ती Ice fall मुळें अचानक कोसळली. ती बर्फाच्या तडयांत सांपडली. Ice fall (हिमखंड) is a terrible thing ! त्यामुळें अशीं अनेक संकटे आ वासून उभी असतांनाच हा प्रवास करावा लागतो. बर्फाचे मोठे मोठे तुकडे हिमखंडात तुटतांना मोठा आवाज होतो. त्यावेळीं इकडे पळूं कीं, तिकडे पळूं अशी परिस्थिती होते. मला हा अनुभव एकदां आला; पण पुढें पुढें ह्याचीही संवय होते. ●●●

**एव्हरेस्ट हजामत !**

एव्हरेस्ट विजय मिळवून परत निघण्यापर्यंतच्या तीन चार महिन्यांच्या काळांत प्रत्येकाच्या डोक्यावरच्या केंसांचं व दाढीचं बरच जंगल वाढलं होतं. जंगलमें सब मंगल असलं तरी सुधारलेल्या जगांत प्रवेश करण्यापूर्वी त्या जंगलाची उच्चाटणं करण्याची अत्यंत आवश्यकता होती. त्यासाठीं खाटमांडूहून खास न्हावी पाचारण करण्यांत आले होते. पंचखाल येथें सर्व सदस्य न्हाव्यांची आतुरतेनें वाट पहात होते. वास्तविक ते दुपारीं १२ वाजेपर्यंत येऊन पोंचायला हवे होते. पण दोन तीन वाजेपर्यंत वाट पाहिली तरी कोणाचा पत्ताच दिसेना. इतक्यांत कोणाच्या तरी लक्षांत गेलं. कॅम्पच्या जराशा बाजूला दोघेजण रुबाबदार कपडे घातलेले, जवळ एक भली मोठी ट्रंक असलेले, कोणाची तरी वाट पहात बराच वेळ उभे आहेत. सहज चौकशी करतां उत्तर मिळालं–"हम लोग एव्हरेस्टवालोंकी हजामत करने आये हैं !"

# एव्हरेस्टवर




[एव्हरेस्टच्या यशस्वी मोहिमेहून परत आल्यापासून डॉ. लाला तेलंग व त्यांच्या नातलगांना अनेक मासलेवाईक शंका व प्रश्न विचारण्यांत येतात. नाना तऱ्हेची मतं प्रदर्शित करण्यांत येतात. ह्या सर्वांतून डॉ. लाला तेलंग यांना "विनोद हेंच रामबाण औषध" ह्याचा प्रत्यय आल्यास नवल नाहीं. अशा इरसाल विनोदांची ही झलक.]

**पे पॅकेट नव्हे, लंच पॅकेट !**

"काय हो, तुम्हांला एव्हरेस्ट चढण्यासाठीं काय पगार होता ?"
"छे हो, पगार बिगार कांहीं नाहीं !"
"मग काय मिळत होतं ?"
"पे पॅकेटच्या ऐवजीं लंच पॅकेट. आणि सारं कांहीं गार गार !"

***

**पुढल्या वर्षीं लवकर या !**

"आमचा लाला, एव्हरेस्ट मोहिमेंतून जाऊन आला !"
"असं असं ! म्हणजे तो दरवर्षींच जातो कीं काय ?"

***

**कथा स्टोव्हची, व्यथा कुणा....**

"काय हो लाला, तुम्ही एव्हरेस्टवर स्टोव्हसुद्धां नेला होता म्हणे ?"
"हो ना !"
"पण तिथं एवढे चोचले हवेतच कशाला ? थोडे दिवस थंड खाल्लं म्हणून बिघडतं कुठं ?"
"समजा तुम्हांला दोन तीन तास रेफ्रिजरेटरमध्यें ठेवलं तर बाहेर आल्यानंतर तुम्हांला आईस्क्रिम खावंसं वाटेल कीं, कांहींतरी गरमा गरम ?"

***

**येथें पहाड मिळतात !**

"लाला एव्हरेस्टहून जाऊन आल्याचं कळलं !"

"हो, चार दिवस झाले"

"मग तिकडे दोन चार पहाड बिहाड बघून आला की नाहीं ?"

★ ★ ★

## तेवढं "छाप्यां"त नव्हतं म्हणून !

"लाला एव्हरेस्ट मोहिमेंतून जाऊन आला म्हणे ! "

"म्हणे ? अहो खरंच आहे ते"

"मग वर्तमानपत्रांत त्याचं नांव कसं आढळलं नाहीं ?"

"तो शिखर चढला नाहीं. म्हणून शिखर चढणाऱ्यांत त्याचं नांव नाहीं !"

"म्हणजे हा पायथ्याशींच होता कीं काय ? आणि मी सर्व टीमची नांव वाचली, त्यांतही नांव नव्हतं !"

"आश्चर्य आहे ! कदाचित् जागा कमी पडल्यामुळें ह्याचं नांव छापलं नसे.लं !"

★ ★ ★

## हेचि काय फल तपाला ?

"लाला एव्हरेस्टवर जाऊन आला खरा पण—" एक चिंतातुर जंतू."

"पण काय ? "

"तसं कांहीं नाहीं. एव्हरेस्ट मोहिमेंत दोन तीन लाखांची तूट आली आहे असं ऐकतो. म्हणजे लालाला बिचाऱ्याला दहा-पंधरा हजार रुपयांचा तरी खड्डा पडणार म्हणायचा ! "

★ ★ ★

## अॅटम बॉम्ब झिंदाबाद !

"लालाच्या टीमनें यंदा रेकॉर्ड ब्रेक केला नाहीं ? "

"हुं ! त्यांत काय मोठंसं ? "

"अहो, बोलतां काय तुम्ही ?"

"खरं तेंच सांगतोय् ! अॅटम बांबच्या स्फोटांनीं स..ळीकडची हवाच मुळीं पार बिघडून गेली आहे. एव्हरेस्टवर आतां पूर्वीइतकी खराब हवा नसते म्हणे. म्हणून तर ह्यांच्या ह्या गमजा ! "

★ ★ ★

## निसर्गाची हांक !

"लाला मामा, थंडींत रात्रीच्या वेळीं तुम्ही एकी व बेकी (नंबर टु) कशी करत होता ?" छोट्या भाचीची "किलबिल"

"चल निघ इथून ! चहाटळ कुठली ! "

★ ★ ★

## रामायण झाले तरी, रामाची सीता कोण !

"अरे लाला, आमच्या पेपरमध्यें तुझा फोटो पाहिला ! "

"असं ? "

"तेवीस हजार फुटांवर गेला होतास म्हणे तूं ? "

"हो ! "

"मग आतां एव्हरेस्टवर कधीं जाणार ?"

"अरे, मी एव्हरेस्ट टीममधनंच तर तेवीस हजार फुटांवर गेलो होतो ! "

"अरेच्या ! म्हणजे परवांच्या टीममध्यें तूं होतास तर ? "

● ● ●

[पान ६३ वरून—एव्हरेस्ट पंचांग]

(आ) आर. बी. लारसन ह्या डॅनिश गिर्यारोहकाचे "एकला चालो रे" पद्धतीचें धाडस. दक्षिणेकडून उत्तरेच्या दिशेने नॉर्थ कोलपर्यंतचा टप्पा गांठला.

१९५२ (अ) स्विस तुकडीची एव्हरेस्टवर पहिली स्वारी. हिमखंडापासून साऊथ कोलपर्यंतचा मार्ग प्रस्थापित केला. २८,२०० फूटांपर्यंत मजल !

(आ) स्विस तुकडीचा दुसरा प्रयत्न. साऊथ कोलच्या वर २६,३०० फूटांवर रोखण्यांत आला.

१९५३ सर जॉन हंट ह्यांच्या नेतृत्वाखालील ब्रिटीश तुकडीचे एव्हरेस्टवर प्रथमतःच यशस्वी आरोहण. सर एडमंड हिलरी व श्री. तेनसिंग नोर्के ह्यांनी २९ मे रोजीं एव्हरेस्ट शिखर गांठून जगाला दिलेला नवा विश्वास !

१९५६ एव्हरेस्ट शिखरावर मानवाची दुसरी यशस्वी चढाई. स्विस तुकडीतील अरनेस्ट शिमीड व जर्ग मार्मेट हे दिनांक २३ मेला व अॅडॉल्फ रीस्ट व हॅन्सरुडॉल्फ हे दिनांक २४ मेला एव्हरेस्टवर चढून गेले ! शेजारच्या ल्होत्सेवर प्रथमतःच चढाई.

१९६० (१) ब्रिगेडियर ग्यानसिंग ह्यांच्या नेतृत्वाखालील संपूर्णतया भारतीय गिर्यारोहकांची पहिली महत्त्वाकांक्षी झेंप. कॅप्टन नरेन्द्रकुमार (आतां मेजर) सोनाम ग्यात्सो आणि नवांग गोम्बू ह्यांनीं २५ मे रोजीं २८,३०० फूटांपर्यंत झेंप घेऊनही बर्फाच्या प्रखर वादळामुळें त्यांची अपरिहार्य माघार.

(२) आपल्या गिर्यारोहकांनीं एव्हरेस्टवर चढाई केल्याचा चि यांचा दावा।

१९६२ (१) मेजर जॉन डायस ह्यांच्या नेतृत्वाखालीं भारतीयांचा दुसरा दुर्दैवी प्रयत्न. २८,६०० फूटांपर्यंत मजल गांठूनही ओंठाजवळ आलेला यशाचा पेला अत्यंत प्रतिकूल हवामानामुळें अखेर दिनांक ३० मेला आंवाक्याबाहेर गेला !

(२) तीन अमेरिकन व एक स्विस गिर्यारोहकांचा उत्तरेकडून अनधिकृत प्रयत्न. सुमारें २५,००० फूटापर्यंत चढाई.

१९६३ एव्हरेस्टवर तिसरी यशस्वी स्वारी. अमेरिकन तुकडीची गौरवपूर्ण कामगिरी. तुकडीचे नेते नॉर्मन डायऱ्हेनफर्थ. अमेरिकन गिर्यारोहकांपैकीं ६ सदस्य लागोपाठच्या तीन—दोन साऊथ कोलच्या रुढ मार्गानें व एक अद्यापपर्यंत न चढलेल्या वेस्टर्न रीज ह्या चाकोरी बाहेरच्या मार्गे—एव्हरेस्टवर पोहोंचले. नवा उच्चांक सिद्ध केला !

१९६५ जगांतील सर्वोच्च शिखरावर भारताचा तिरंगी झेंडा एकूण चार वेळां फडकला आणि "झंडा ऊँचा रहे हमारा" ही काव्यपंक्ति सार्थ ठरली. निर्भेळ भारतीय प्रयत्नांच्या चित्तथरारक विजयानें भारताचे नांव अधिक उज्ज्वल केलें !

● ● ●







शुभ्र डेटने
कपडे स्वच्छ नि
पांढरेशुभ्र निघतात


det
PROUD OF YOUR WASH
Swastik Oil Mills Ltd., Bombay 31
डेट




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



